

# हर्शल व नेपच्यून

उर्फ

# प्रजापति व वरूण.

( या दोन नव्या ग्रहांचें सहाशष्ट अमूल्य कुंडलीसंग्रह व
तीन शतकांतील स्पष्टस्थितिसह फलवर्णन. )

लेखक आणि प्रकाशकः-माधवी-वसंत.

Co कान्ट्री-ईनामदार, दुधियातळाव.

नवसारी.

श्री लक्ष्मी इलेक्ट्रीक प्रि. प्रेस कं. लि. भाऊकाळेनी गलीमां पटेल छोटालाल
लालभाईए प्रकाशकने माटे छाप्युं. ता. १०-६-२६.

किंमत दोन रुपये.

# वाचकांस सविनय विनंती.

याच ग्रहाच्या फलाचें संशोधन यापुढेंहि लेखकानें पुढें टेवलें असून काही - विशिष्ट-चमत्कारिक अशा अनुभवाच्या जन्मकुंडल्या अथवा जन्मसन तारीख-वेळ स्थळ किंवा शके-मास-घटि आम्हास ज्यांच्याजवळ असतील त्यांनी पुरविण्याची तसदी घेतल्यास प्रत्यक्ष संशोधन कार्यास मदत केल्या सारखें होईल कार्य सर्वांचे आहे. विशेषत: वेड फेंपरे धनुर्वात-जलोदर-अपघात पिशाच्चबाधा, जारण मारण, मंत्र तंत्र, जादुगरी गुप्त गुप्त शास्त्र ( हिप्नाटीस्ट मेस्मेरिस्ट ), खुनी-दरोडेखोर, व्यभिचार, गुप्त रोग अशा अनुभवाच्या कुंडल्या मिळाल्यास उत्तम नांव नसेल तरी चालेल परंतु पुरुष स्त्री लिंग सूचक स्पष्टता असावी.

सायकॉलॉजीवर सुताच्या हस्तलिखित " जातक रहस्य " नावाचे ४ ते ५ भाग आम्ही तयार करीत असून त्यांपैकी ' ग्रहफलें ' हा प्रथम भाग किं० रु० २॥ प्रसिद्ध झाला आहे दुसरा भाग प्रश्न जातकाचा लवकरच प्रसिद्ध होईल. प्रति दरेक भागाच्या मर्यादित प्रतींचे ५० च छापून सदर भाग म्हणजे पाश्चिमात्य पौर्वात्य फलग्रंथातील तत्वांचे फलविवेचन व सारच होय. सर्व भाग रु० १० ला मिळतील परंतु रु० ५ पाठवून नाव नोंदवले पाहिजे. श्रीयुत रा. नवाथे त्रि गो; ना स मराठ इत्यादिकांचे अभिप्राय आहेत विशेष माहितीसाठी पत्रक मागविणे

या शिवाय फल जातक भविष्य फल, जन्मकुंडली बद्दल तात्विक विवेचन वगैरे महत्वाचीं व जबाबदारीचीं कामें फावल्या वेळात मोबदला घेऊन आम्ही करतों

---

# आत्मोद्गार.

सन १९१६ पासून या दोन नव्या ग्रहांच्या फलांकडे आमचें लक्ष्य वेधलें व सन १९१८ मध्यें **ज्योतिर्विजय** मासिकांत प्रथम त्रोटक फलें या ग्रहांचीं आम्हीं दीलीं होतीं; परंतु स्वतंत्र ग्रंथ या दोन ग्रहांच्या फलांवर मराठी जातकवाङ्मयांत असणें अत्यावश्यक वाटून त्या मार्गानें शक्य तितकी माहिती संकलित केली. बहुतेक पाश्चात्य जातकज्ञांचीं मतें विचारांत घेऊन व चिकित्सक दृष्टि आणि अनुभव यांची जोड देऊन ग्रंथ तयार केला. हा ग्रंथ वास्तविक १९२३ च्या आरंभासच प्रसिद्ध व्हावयाचा होता.

लेखकाचा जन्म जरी पिढीजाद खानदान घराण्यांत झाला होता तरी याच पिढींत या घराण्यावर भयंकर आपत्ति कोसळू लागल्या होत्या अशास्थितींत हें कार्य नेटानें शेवटास नेण्याचें ठरविलें होतेंच परंतु आपचा उत्साह व नेट ज्य स्त कीं ग्र पत्तीचे तडाखे ज्यास्त तीव्र याच्या परिक्षेची. वेळ सन १९२० पासून सुरूं झाली घराण्याची सर्व जबाबदारी शिरावर घेऊन घराण्यावर आलेल्या चोहोंबाजूच्या आपत्तींशीं तोंड देतांना हें कार्य रेंगाळत चाललें, मध्यंतरीं कित्येकवेळां निराशा झाली तरी पुन्हां पुन्हां कार्य घ्यावें पुन्हा अडचणीच्या परिस्थितिकडे लक्ष द्यावें असें करीत हें प्रकाशन आज शेवटास जात आहे.

या कामीं आम्हांस कांहीं गृहस्थांची मदत व उत्साह मिळाला म्हणून हा ग्रंथ आज तरी प्रकाशित होत आहे. आमचे प्रेमळ स्नेही व जातकाभिमानी श्रीयुत रा. रा. **हरगोवन लल्लुभाई तलाटी** व नडीयाद येथील श्रीयुत रा. रा. रा. **पां. कान्हेरे** यांनीं वेळेवर अधिक मदत केली आहे त्याबद्दल त्यांचे आम्हीं ऋणीच आहोंत. या शिवाय येथील जातकज्ञ शेट **अरदेशीर बीलीमोरीया**, एम. ए. यांनीं आपल्या जवळ असलेल्या पाश्चात्य ज्योतिर्ग्रंथांचा बराच चांगला संग्रह मजकरितां सतत उघडा ठेवल्यानें या ग्रंथांतील फलविवेचन, तुलना व उपसंहार लिहिण्यास फारच मदत झाली आहे. या ग्रंथास चिकित्सक-स्पष्ट विचारात्मक व ग्रंथपरिक्षणात्मक प्रस्तावना 'ज्योतिर्माला' संपादक श्रीयुत रा. रा. **यशवंत केशव प्रधान** यांनीं लिहून आम्हांस जसे अभारी केले त्याच प्रमाणें श्रीयुत रा. रा. **चिं. गो. नवाथे** (कुंडली विज्ञान संपादक), श्रीयुत रा. रा. **ना. स. मराठे** (हर्षल संपादक), श्रीयुत रा. रा. **दा. ना. आपटे**, बी ए. एल, एल. बी. इत्यादि फलजातकज्ञांनीं उत्साहजनक व प्रेमळ अभिप्राय ग्रंथ वाचून दीले या बद्दलहि त्यांचे आभार आम्हीं मानणें अवश्यक आहेत.

आमचे बडोद्याचे स्नेही श्रीयुत रा. रा. शंकरराव वखारीकर यांनीं आम्हीं अनेक अडचणीं असतां आमच्या साठीं सनरादां प्रेसकडे धांव घेऊन छपाई-कंपोज-प्रुफें पासून तों प्रकाशना पर्यंत फारच निरलसपणें आम्हांस मदत केली आहे.

सदर ग्रंथाची छपाई तीन प्रेसमध्यें झाली आहे त्यांत बडोद्याच्या लक्ष्मीइलेक्ट्रिक प्रेस कं. चे मॅनेजर छोटालाल लालभाई यांनीं फारच श्रम व अडचण सोसलेली आहे.

या शिवाय कित्येकांकडून आम्हांस जन्मकुंडल्या मिळाल्या आहेत व दुसरी पण फार मदत झाली आहे त्या सर्वांचे आम्हीं आभारी आहोंत.

ग्रंथ 'शास्त्रीय संशोधन व सत्य-चर्चात्मक विधाने' या एकाच ध्येयास्तव लिहून लिहिला आहे. ग्रह नवे, त्यावरील माहिती अनुभवाच्या कसोटीस पूर्ण न उतरणारी असी, फक्त कांहीं पाश्चात्य ग्रंथ या रूपानें असलेली, आमची परिस्थिति, अडचणी व नाना विघ्नें, त्यांत अशुभग्रहांसाठीं कुंडल्या जमविण्याचा वयोग वगैरे सर्व गोष्टी लक्ष्यांत घेऊन वाचकांनीं व विद्वानांनीं दोषाकडे नजर न देतां प्रेमळ दृष्टीनें ग्रंथाचें महत्व ठरवावें एवढीच विनंती आमची आहे. पुनर्मुद्रणाचा सुयोग भवितव्यतेनें आणिल्यास शुद्धाशुद्धें व विचारसरणि आणि जास्त स्वानुभव या बाबतींत ग्रंथ ज्यास्त निर्दोष करण्याकडे आमचें लक्ष्य राहील.

ज्येष्ठ शुद्ध १<br>शके १८४८<br>शुक्रवार.

आपला,<br>माधवी-वसंत.

## या ग्रंथावरील महत्वाचे अभिप्राय.

( १ )

रा. रा. माधवी वसंत, कान्ही इनामदार यांसः—

सा. न. वि. आपण पाठविलेलें हर्शेल–नेपच्यून हें पुस्तक पावलें.

आपण हें पुस्तक शक्य तितक्या पुऱ्या व शोधपूर्वक माहितीनें आधुनिक पद्धतीनें लिहिलेले असल्यामुळें ज्ञानवर्धक झालेलें आहे, व आपण ज्योतिष वाङ्मयांत चर्वितचर्वण न करितां नवीन भर टाकलेली आहे यांत शंका नाहीं. हे ग्रह नवीन असल्यामुळें हिंदुस्थानांतील ज्योतिषीवर्गांस त्यांची कल्पनाहि नव्हती. हर्शेल–नेपचून म्हणजेच राहू व केतु अशीहि पुष्कळांची समजूत झालेली होती. अकस्मिकता, अद्भुतता, अपूर्वता, लोकविलक्षण शक्ति, अतींद्रिय ज्ञान इत्यादि बुद्धीच्या कार्य-क्षत्राच्या पलीकडील कल्पनातीत गुण पूर्वीच्या सात ग्रहां पैकीं एकाहि ग्रहांत नहींत यामुळें अमुक बालक पुढें अद्भुत सामर्थ्याचें होईल व ह्याचें आयुष्य चमत्कारमय होईल याची बरोबर कल्पना होण्यास मार्ग नव्हता. ही उणीव या ग्रहांनीं भरून काढलेली असल्यामुळें त्यांची मिळेल तितकी माहिती ज्योतिष वाङ्मयांत समाहित होणें अवश्यक होतें. हें काम आपण अत्यंत श्रमानें व बुद्धिचातुर्यानें केलें असल्यामुळें सर्व महाराष्ट्र वाचकावर आपले उपकार झालेले आहेत असें मी समजतों.

कळावें लोभ असावा हे वि.

( म. ) विष्णु गोपाळ नवाथे.
कुंडलिविज्ञान संपादक.

---

( २ )

इतर सर्व शास्त्रांप्रमाणें परीक्षणाच्या मशीत घालून तावून सुलावून सुलावून घेण्याचा प्रसंग सांप्रत ज्योतिषशास्त्रालाहि आला आहे. हजारो वर्षेपर्यंत हिंदुस्तान इजिप्त वगैरे देशांतून फलज्योतिषाचा जो अभ्यास चालत आला आहे, तो केवळ कांहीं लोकांच्या मानसिक उन्मादाचें लक्षण होय किंवा त्या उन्मादांत अथवा वेडांत कांहीं पद्धत आहे याचा निर्णय करण्याचें काम हल्ली सुरू झालें आहे. अशावेळीं या

*The Astrological Studio, Navsari,*

Dear Mr Madhava Vasant,

I have gone through your Marathi Book on Herschel & Neptune and I am pleased to say that it certainly is the first book of its kind in Marathi There is one such brochure in Hindi, published by a Rutlam Astrologer but your book is very exhaustive in as much as your suppositions of the influence of these two mystic planets are supported by a number of kundalies, and you have treated the planets in their genethliacal and mundane aspects

You book contains a fund of information for practical students of Astrology, and it requires careful and attentive study, rather than a cursory reading

I feel sure it will prove useful to astrological students and will be appreciated as it ought to be

Wishing you success
Yours sincerely
**Sd. A. N. Billimoria** M A.
Navsari


DHARA SA BHAVAN LIBRARY

# अनुक्रमणिका.

## हर्शेल उर्फ प्रजापति भाग १ ला.



## नेपच्यून उर्फ वरुण भाग २ रा.



## भाग ३ रा.

# शुद्धिपत्र.



( ग्रंथप्रकाशन व कंपोज गुजराथी प्रेसमध्यें झालें आहे व दोनदोनदां तीन तीनदां प्रुफें तपासूनहि र्‍हस्व दीर्घादि शुद्धाशुद्ध सुधारण्यात प्रथाच्या अर्ध्या पृष्ठाची जोड देणें भाग आहे म्हणून तों मार्ग सोडून खालील शुद्धेंच महत्वाचीं अशीं दीलीं आहेत )

| पृष्ठ. | ओळ. | अशुद्ध | शु. |
|---|---|---|---|
| ३ | ६ | प्राणीअनास | प्राणीजाम |
| ८ | १ ( टीप ) | रशीन | इम्रिन् |

परिशिष्ट १ लें.

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | कु नं ३७ | मंगळ कन्या १९ | द्वितिय स्थान सिंह २७ |
| ६ | ,, १७, | गुरु तूळ २६–३ वक्री. | |
| ,, | ,, १८ | शुक्र कर्क | १७ |
| १० | , ३६ | रवि | सिंह १२–३५ |
| १९ | ,, ५५ | द्वितिय स्थान क १९, षष्ठस्थान कुंभ २ | |
| १३ | ,, ३९ | राहू मीन २७–४ मंगळ मेष, २३–१०, चंद्र वृषभ ५, बुध धनू ०–२२, शुक्र धनू १६–३१, षष्ठ स्थान कन्या २६ | |
| १९ | ,, ५६ | रवि कर्क २० | |
| १९ | ,, ५७ | सू पूर्वी १ कलाक. | |
| १३ | | उपसहार लग्न वृषभ ३–३८ | |

---



ॐ.

# प्रस्तावना.

सर्वं रूपमयि देवी सर्वं देवीमयं जगत् ।
अतोऽहम् विश्वरूपात्वं नमामि परमेश्वरीम् ॥ १ ॥

सन १९२१ सालच्या सुमारास 'माधवी वसंत' या सद्दीनें ज्योतिर्विजयामध्यें हर्शेल व नंतर नेपच्यून या दोन ग्रहांवर एक विचारपूर्वक लेखांची मालिका हल्लींच्या ग्रंथकारानें सुरू केली होती, पुढें याच विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहून जनसमाजापुढें ठेवण्याचा लेखकानें निश्चय करून मी या विषयासंबंधीं कांहीं सूचना कराव्यात व या भावी पुस्तकाला प्रस्तावनेची पण जोड मीच द्यावी असें सुचविण्यांत आलें होतें त्यावेळीं तें काम मी मोठ्या हौसेनें करीन असें ग्रंथकारास कळवून त्यांच्या पुस्तकाचे फार्म जसे जसे छापून तयार होतील तसतसे माझ्याकडे पाठविल्यास किंवा समग्र पुस्तक छापून झाल्यावर माझ्याकडे पाठविल्यास मी आठचार दिवसांत जे कांहीं विचार सुचतील ते लिहीन असें कळविलें.

हर्शल ( प्रजापति ) ग्रह आहे किंवा नाहीं त्याच प्रमाणें नेपच्यून ( वरुण ) दिसतो किंवा नाहीं, आर्यवाङ्मयांत याचा उल्लेख केलेला नाहीं म्हणून किंवा हे यवनांनीं शोधून काढल्यामुळें आमचें सोवळें शास्त्र त्यांच्यायोगें कसें विटाळावें असल्या क्षुद्र विचारांचें गाठोडें उराशीं बाळगणाऱ्यांकरितां प्रस्तुतचा ग्रंथ नसून प्रागतिक मनुष्यास आपलें परज्योतिषशास्त्राच्या ज्ञानाचें असलेलें भांडवल अपुरें आहे असें वाटत असेल असल्या विद्यार्थ्यांकरितां हा ग्रंथ आहे; स्वयंमन्य बनलेल्या पंडितांकरितां नाहीं तुमचे हे हर्शल आणि नेपच्यून म्हणजे आमच्या ग्रंथामध्यें सांगितलेले राहु-केतु किंवा धूमादि अप्रकाशित ग्रहांपैकींच आहेत ना ? अशा तऱ्हेचे अज्ञान प्रश्नक व कुचकट प्रश्न विचारणाऱ्या लोकांनां प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनानें पुष्कळच माहिती मिळेल यांत संशय नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या ग्रंथामध्यें ग्रथित केलेले विचार चांगल्या ज्योतिर्विदांसही विचार करण्यासारखे आहेत. विशेषतः प्रत्येकानें प्रजापति-वरुणां च्या

# शुद्धिपत्र.



( ग्रंथप्रकाशन व कंपोज गुजराथी प्रेसमध्यें झालें आहे व दोनदोनदा तीन तीनदां प्रुफें तपासून्हि ऱ्हस्व दीर्घादि शुद्धाशुद्धें सुधारण्यात ग्रंथाच्या अर्ध्या पृष्टाची जोड देणें भाग आहे म्हणून तो मार्ग सोडून खालील शुद्धच महत्वाची अशी दीलीं आहेत )

| पृष्ट. | ओळ. | अशुद्ध. | शु. |
|---|---|---|---|
| ३ | ६ | प्राणीजनाम | प्राणीनाम |
| ८ | १ ( टीप ) | रक्षीन | इच्छिन् |

## परिशिष्ट १ लें.

| | | | |
|---|---|---|---|
| १३ | कु न ३७ | अगत्र कन्या १९ | द्वितिय स्थान सिंह २७ |
| ६ | „ १७. | गुरु तूल २६-३ वर्षी. | |
| „ | „ १८ | शुक्र कर्क | १७ |
| १२ | , ३६ | रवि | सिंह १२-३५ |
| १९ | „ ५५ | द्वितिय स्थान क १९, षष्टस्थान कुंभ २ | |
| १३ | „ ३९ | राहु मीन १७-४ मंगळ मेष, २३-१०, चंद्र वृषभ ५, बुध धनू ०-२२, शुक्र धनू १६-३१, षट स्थान कन्या २६. | |
| १९ | „ ५६ | रवि कर्क २० | |
| १९ | „ ५७ | सू पूर्वी १ कलाक. | |
| १३ | उपसहार रग्न वृषभ २-१८ | | |



ॐ.

# प्रस्तावना.

सर्वं रूपमयि देवी सर्वं देवीमयं जगत् ।
अतोऽहम् विश्वरूपास्त्वं नमामि परमेश्वरीम् ॥ १ ॥

सन १९२१ सालच्या सुमारास ' माधवी वसंत ' या सहीनें ज्योतिर्विजयामध्यें हर्शेल व नंतर नेपच्यून या दोन ग्रहावर एक विचार-पूर्वक लेखाची मालिका ह्यांच्या ग्रंथकारानें सुरू केली होती, पुढें याच विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहून जनसमाजापुढें ठेवण्याचा लेखकानें निश्चय करून मी या विषयासंबंधीं कांहीं सूचना कराव्यात व या भावी पुस्तकाला प्रस्तावनेची पण जोड मीच द्यावी असें सुचविण्यात आलें होतें त्यावेळीं तें काम मी मोठ्या हौसेनें कबूल असें ग्रंथकारास कळवून त्यांच्या पुस्तकाचे फार्म जसे जसे छापून तयार होतील तसतसे माझ्याकडे पाठविल्यास किंवा समग्र पुस्तक छापून झाल्यावर माझ्याकडे पाठविल्यास मी आठचार दिवसांत जे कांहीं विचार सुचतील ते लिहीन असे कळविले.

हर्शेल ( प्रजापति ) ग्रह आहे किंवा नाहीं त्याच प्रमाणें नेपच्यून ( वरुण ) दिसतो किंवा नाहीं, आर्षवाङमयांत याचा उल्लेख केलेला नाहीं म्हणून किंवा ते पश्चिमेकडील लोकांनीं शोधून काढल्यामुळें आमचें सोवळें शास्त्र त्यांच्यायोगें कमें विटाळावें असल्या क्षुद्र विचारांचें गाठोडें उराशीं बाळगणाऱ्यांकरितां प्रस्तुतचा ग्रंथ नसून प्रागतिक मन ज्यांस आपलें परज्योतिषशास्त्राच्या ज्ञानानें असलेलें भांडवल अपुरें आहे असें वाटत असेल असल्या विद्यार्थ्यांकरितां हा ग्रंथ आहे; स्वयंमन्य बनलेल्या पंडितांकरितां नाहीं तुमचे हे हर्शेल आणि नेपच्यून म्हणजे आमच्या ग्रंथामध्यें सांगितलेले राहु-केतु किंवा धूमादि अप्रकाशित ग्रहापैकींच आहेत ना ? अशा तऱ्हेचे अज्ञान प्रदर्शक व उथळ-चट प्रश्न विचारणाऱ्या लोकांना प्रस्तुत ग्रंथाच्या वाचनानें पुष्कळच माहिती मिळेल यांत संशय नाहीं. इतकेंच नव्हे तर ह्या ग्रंथामध्यें ग्रथित केलेले विचार चांगल्या ज्योतिर्विदांसही विचार करण्यासारखे आहेत. विशेषतः प्रत्येकानें प्रजापति ग्रहाच्या

फलांची तुलना हा शेवटचा भाग फार चारकाईनें वाचावा इतका तो मार्मिक व चोकसपणानें लिहिला आहे. हर्शल नेपचूनचें काय खंड आहे याचा आस्थावाईक अभ्यास करणारांना या पुस्तकानें अनेक पाश्चिमात्य ज्योतिर्विदाचा अनुभव पहावयास मिळेल. गेल्या ४०–५० वर्षांमध्यें या ग्रहा संबंधीं झालेले विचार विनिमय व त्यावरुन सिद्धांतरुपानें बाहेर पडलेले विचार या पुस्तकांत साररूपानें आलेले असल्याकारणानें प्रस्तुतचा ग्रंथ ज्योतिर्वाङ्मयामध्यें फार उपयुक्त झालेला आहे.

सुमारें १२।१४ वर्षां पूर्वीच प्रथमत या ग्रहांकडे आमचें लक्ष्य लागलें व आपणा मध्यें या ग्रहाविषयीं फार अधुक कल्पना आहे असें वाटल्यावरून अॅलन लिओ व इतर एक दोन युरोपिअन ग्रंथकारांच्या सहायानें कुंडलिविज्ञान मासिकामध्यें या विषयावर सन १९०९।१० मध्यें एक लेख प्रसिद्ध केल्याचें आठवून येईल, व पुन्हां एकदां ज्योतिर्मालेमध्यें या दोन ग्रहांसबंधीं सविस्तर विवेचन केलेलें आहे, तरी देखील अद्यापि या ग्रहासंबंधानें चर्चा निघाली असतां फारच हास्यास्पद कल्पना पहावयास मिळतात हा अनुभव आमचाच आहे असें नसून तो सर्व सायन ज्योतिर्विदास येोग्य बहुत प्रमाणानें पहावयास मिळत असेलच हर्शल किंवा प्रजापति व नेपचून अथवा वरुन यांचे अस्तित्व ग्रहमालेमध्यें दुर्बिणीच्या सहायानें सहज सिद्ध होतें, व हे फल ज्योतिषशास्त्रात घेतल्यास फलें कशीं अनुभवांत येतात व कित्येक दुर्बोध फलास कशी सुबोधता येते हें स्वानुभवावरुन व सिद्ध होईल, व त्या कामीं या ग्रंथांत संकलित केलेली माहिती फार उपयुक्त आहे ग्रंथकारानें तीन शतकांतील कोणत्याही दिवसाची या ग्रहाची स्पष्ट स्थिति काढण्यास जीं कोष्टकें दीलीं आहेत तीं फार उपयुक्त आहेत. फलादेश पहाण्याकरितां निवडक ठळक आणि प्रसिद्ध व्यक्तींच्या ६६ जन्मकुंडल्या ग्रंथकारानें जोडल्या आहेत त्या फल निरीक्षणाच्या बाबतींत संग्रह या दृष्टीनें अमूल्य आहेत, व फलाचा पडताळा आणि अनुभव ठरविण्यास महत्वाचें साधन झालें आहे. ग्रंथांत कुंडल्या व ग्रहांची स्थिति सायन पद्धतीची आहे म्हणून प्रग पग सायनवाद्याच्याच बापजाद्यांची गिरास व निरयन बाद्याम अतएव त्याज्य असले कुत्सित विचार आणण्याचें प्रयोजन नाहीं सौंदर्य व हल्लींच्या अयनांशांच्या सांवळ्या गोंधळाच्या अडचणींत हीच दीशा ग्रंथकारानें स्वीकारणें योग्य आहे. ० अयनांशापासून १८।२२।२३ वगैरे वाटेल तितके अयनांश याच सायनस्पष्टस्थितिमधून वजा करून निरयन स्थिति मिळणें कठीण नाहीं. ग्रंथकारानें केलेले श्रम, इतस्तत पसरलेली त्रोटक माहिती एकत्र सूत्ररूपांत आणून व त्याला स्वतांच्या चिकीत्सक विवेचनाची दिलेली जोड पाहून या ग्रंथासारखा

माहीतीनें भरलेला व मार्मिक विवेचनानें परिप्लुत असलेला ग्रंथ हिंदी-मराठी व गुजराथी भाषेंत अद्यून आमच्या पहाण्यांत नाहीं. या ग्रंथाचा महाराष्ट्रवाचक फार प्रेमानें आदर करुन ग्रंथकाराच्या या स्तुत्य कृतीस प्रोत्साहन देऊन ग्रंथकारास फलज्योतिषशास्त्ररूप देवतेची आणखी अशीच सेवा करण्याचा मांगलिक सुयोग आणून देतील अशी आम्हांस फार आशा आहे.

फल ज्योतिषशास्त्रांत १२ राशी व ९ ग्रह हेंच मुख्य असून यांचाच चांगल्या तत्त्वशुद्ध पायावर अभ्यास होणें इष्ट आहे. फलज्योतिषशास्त्राच्या संशोधन कार्यांत हें काम फार महत्त्वाचें आहे. सायननिरयनाचा धिंगाणा किंवा कुंडल्यांचा संग्रह करण्याचें भलतेंच खूळ माजविण्यापेक्षां या सारख्या उपयुक्त कार्याला सुरवात होईल तर फार बरें. परंतु या विषयाकडे अद्यापि आमचें मुळींच लक्ष्य गेलेले नाहीं पुण्यास झालेला फलज्योतीष परिषदेमधून निर्माण झालेले भारतीय ज्योतिर्मंडळ या कामाकडे लक्ष्य देईल असें वाटत होतें परंतु अद्यापि याकडे कोणाचें लक्षच नाहीं. पाश्चिमात्य ज्योतिर्विदांनीं या संबंधानें बरीच धडपड चालविली आहे असें पहावयास मिळतें.

मंडळाच्या सभासदानें किंवा प्रत्येक ज्योतिर्विदानें एकेक राशि घेऊन त्यासंबंधी असलेली सर्व माहिती गोळा केल्या नंतर त्यास आपल्या अनुभवाची व चिकित्सेची जोड द्यावी व नंतर ती माहीती मंडळापुढें किंवा ज्योतिर्विदांपुढे चर्चेकरितां व वाद विवादाकरितां मांडावी. असें केलें असतां संशोधनाचे कामांत फारच मदत होणार आहे. कारण याच वादविवादाचे वेळीं नवीन प्रमेयें व अनुभव बाहेर पडणें शक्य असतें. ज्यांच्या कुंडलीमध्यें जी राशी किंवा जो ग्रह विशेष प्रबल असेल त्यांनीं तीच राशी किंवा तोच ग्रह विचार करण्याकरितां घ्यावा. प्रबळ असलेल्या ग्रहाचे किंवा राशीचे गुणधर्म असल्या व्यक्तींना विशेष चांगले कळतात, असा आमचा अनुभव आहे. संशोधनाचें कार्य फार दीर्घ श्रमानें व मेहेनतीचें आहे. प्रसिद्ध ग्रंथकार ॲलन लिओ हे गेल्या २०-२५ वर्षांमध्यें नुसत्या प्रजापतीच्या गुणधर्मांचें सूक्ष्म निरिक्षण करीत होते; तरी त्यांस या ग्रहाच्या फलांचा ठाव घेतां आला नाहीं. तीच स्थिति आमची आहे. सन १९१० पासून या दोन ग्रहांच्या फलादेशाकडे आमचें लक्ष्य आहे, तरी त्यांच्या सर्व स्थानपरत्वें व राशीपरत्वें सूक्ष्म फलांचा अनुभव आला आहे असें म्हणवत नाहीं. संशोधनाचें कार्य एका व्यक्तिचें नाहीं. हें काम संघशक्तीच्या जोरावर करावयाचें आहेत असा तऱ्हेनें प्रयत्न सुरु केल्यास लवकरच आपणास प्रत्येक ग्रहावर व राशीवर अनुभवजन्य ज्ञानानें परिप्लुत असलेले निरनिराळे निबंध किंवा ग्रंथ पहाण्यास मिळतील. या प्रकारच्या संशोधन कार्यांत आमचे महाराष्ट्र ज्योतिर्वि-

बघु सुरवात करतील अशी आशा आहे. अशाच तऱ्हेचे प्रयत्न पाश्चिमात्य देशांत चालू आहेत. मॉडर्न अस्ट्रॉलॉजीचे संपादक ज्योतिर्विद ॲलन लिओ यांनी ' **मार्स धी वार लार्ड** ' ' **सॅटर्न धी रीपर,** ' ' **ज्युपीटर धी प्रिझर्व्हर,** ' या प्रमाणें प्रत्येक ग्रहावर एक एक स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला होता. त्यांचें अकालीं निधन झालें नसतें तर हर्शलवर ' **युरेनस धी रीफॉर्मर** ' किंवा ' **अवेकनर** ' या नांवाचें पुस्तक पहाण्यास मिळालें असतें.

हर्शल उर्फ प्रजापति यास सत्वरजतमाच्या त्रयींत ओढण्यापेक्षां त्याच्यामध्यें कोणकोणत्या ग्रहाचे गुणधर्म पहाण्यास मिळतात हें पाहीलें असता फलादेशाचें काम पुष्कळ सुलभ होईल. बहुतेक आंग्ल ग्रंथकार व लेखक या ग्रहाला तीव्रबुध (**आक्टेव्ह ऑफ मर्क्युरी** ) मानतात. संगीत शास्त्रामध्यें पहिल्या सप्तकांतील तोच स्वर दुसऱ्या सप्तकांत ज्याप्रमाणें अति कोमल किंवा अतितीव्र होतो त्याच अर्थानें प्रजापतिला अक्टेव्ह ऑफ मर्क्युरी म्हटलें आहे. नेपचूनला त्याच न्यायानें ( आक्टेव्ह ऑफ व्हीनस ) तीव्र शुक्र मानण्याची पुष्कळ ज्योतिर्विदांची विचारसरणी आहे. पुष्कळ पाश्चिमात्य ज्योतिर्विद व विशेषत ॲलन लिओ, सफेरीअल, केली वगैरे ग्रंथकार हर्शल हा सूर्याचा प्रतिग्रह तर नेपचून चंद्राचा प्रतिग्रह मानतात. फलज्योतिषशास्त्रामध्यें वस्तुत ग्रहाचा विचार होतो. रवि हा ग्रह नाहीं. पृथ्वी क्रांतिवृत्तांत फिरत असतां ती ज्या ठिकाणीं असते त्याच्या विरुद्ध १८० अंशांवर सूर्य असल्याचा आपणास भास होतो व ही पृथ्वीची स्थिति आपण कुंडलिमध्यें रवीनें दर्शवीत आहोत. रवि हा तारा असून त्याच्याभोंवतीं आपली पृथ्वी इतर ग्रहासहित फिरत आहे. त्याचप्रमाणें चंद्र हा पृथ्वीचा उपग्रह आहे. जर आपण फलज्योतिषशास्त्रामध्यें इतर ग्रहाच्या उपग्रहाचा विचार करीत नाहीं तर चंद्राचाही काय म्हणून विचार करावा असा प्रश्न नैसर्गिकच उत्पन्न होतो. म्हणून या दोन गोलांना प्रत्यक्ष ग्रहाच्या यादींतून काढून जर त्याच्या ठिकाणीं ग्रहाचीच योजना करणें असेल तर रवीच्या ठिकाणीं हर्शल उर्फ प्रजापति व चंद्राच्या जागीं नेपचून उर्फ वरुण यांची योजना अयोग्य होणार नाहीं. म्हणजे रवीचे बरेच गुणधर्म तर प्रजापतिमध्यें तर चंद्राचे बरेच गुणधर्म नेपचूनमध्यें पहावयास मिळतात; व साधारणपणें आमचा अनुभव पण असाच आहे.

हर्शलचीं फलें बऱ्याच कुंडल्यामध्यें नेपचूनपेक्षां ज्यास्त स्पष्ट व तीव्रतेनें पाहण्यास मिळतात. हा ग्रह रवीच्या धर्माप्रमाणें मानसन्मान, कीर्ति, आकस्मिक मोठाले सांपत्तिक लाभ, पदव्या व एकदम उन्नति किंवा अधिकार देतो. या ग्रहामध्यें **रवि, मंगळ, बुध** या तीन ग्रहाचे गुणधर्म संकलित झालेले दृष्टीस पडतात. हा ग्रह

इलेक्ट्रीक वर्क्स, रेल्वे, हायर मेकॅनिक्स याचा कारक मानण्यास हरकत नाहीं. मंगळामुळें एकादास यंत्रकला येईल. परंतु चमत्कृतिजनक नवीन यंत्ररचना मंगळाकडून होणार नाहीं. तेथें हर्षलच्याच कौशल्याची अवश्यकता आहे.

हर्षल हा ग्रह शनि इतका खलग्रह आहे असें अनुभवास येत नाहीं, व त्या मुळें त्याला पापग्रह म्हणावें किंवा नाहीं या विषयीं आमच्या मनात जबरदस्त शंका उत्पन्न होते. स्वतंत्रपणें हर्षलच्या योगानें मृत्यु आलेला आम्हास अद्यापि पहावयास मिळाला नाहीं. याचें उलट नेपच्यून, शनि किंवा मंगळाचें पहावयास मिळतें. हर्षलची फलें मात्र फार तीव्र व क्रांतितत्वाला धरून राहणारीं आहेत. हें कोणासही सहज अजमाविता येईल. नवीन सुधारणा किंवा नवमतवाद पुढें येण्यास घडामोडी व जुन्या मताच्या किंवा आचरणाच्या ठिकऱ्या उडाल्या पाहीजेत. हें उघड आहे. हर्षल याला रीफॉर्मर ( सुधारक ) किंवा अवेकनर ( जागृति करणारा ) हें नाव त्याच्या लीलाशीं पुष्कळ जुळतें आहे. स्वतां हा ग्रह तमोगुणी म्हणण्यापेक्षां बुधाप्रमाणें ज्या ग्रहानें तो युक्त-दृष्ट-संबंधित असतो त्याप्रमाणें फलें स्पष्टपणे अनुभवास देतो हें विधान ज्यास्त अनुभवास येतें. हर्षल हा इलेक्ट्रीक करंट ( विद्युप्रवाह ) आहे तो योग्याच्या ठिकऱ्या उडवील तर जगडव्याळ कारखाने चालवील. बटन दाबल्यास क्षणात भयंकर स्फोट करून संहारही करील. विद्युच्छक्ति जशी ज्या कामीं वापरली जाते तशी ती काम करू शकते तद्वत हर्षल ज्या ग्रहानें संबंधित असेल त्या मानानें व तशी फलाची तीव्रता तो दाखवितो यांत संशय नाहीं.

हा ग्रह वैशाचिक साधने किंवा बाधा दाखवितो किंवा काय या संबधानें अनुभवाव्यतिरिक्त आम्हास काहींच सांगतां येत नाहीं. परंतु तिकडे [illegible] ग्रह लक्ष वेधील असें आम्हास वाटत नाहीं. याला पाश्चिमात्यानीं गुप्त ( Occult ) म्हटलें आहे म्हणून तो असल्या साधनाकडे मनाचा कल करील असे म्हणतां येत नाही. शनि-राहू व केतु याचा पिशाच्चबाधेबरोबर असलेला संबंध पुष्कळवेळा पाहण्यास मिळतो, किंवा त्यासारख्या तऱ्हेचा नेपच्यूनचा संबंध पहावयास मिळतो अदृश्य कोटीमध्यें राहणाराचे पिशाच-गुह्यक-गंधर्व-यक्ष व किन्नर वगैरे प्रकारें आमच्या ग्रंथकारानीं भेद कल्पिलेले आहेत त्यांतील हलक्या योनींशीं राहु-केतु किंवा शनीचा संबंध असेल तसा वरुणाचा मात्र नसेल. हर्षल हा [illegible] ग्रह आहे, असल्यामुळें हर्षलदर्शित माणसें सिद्धिप्रिय किंवा त्यासंबंधी धडपड करणारी असू शकतील. यां ग्रहाला दुसऱ्या निष्फळ अध्यात्मज्ञानाच्या [illegible] फार नाहींत, त्याबरोबर त्याला चमत्काराची पण फार आवड आहे

हा ग्रह स्वातंत्र्यप्रिय व स्वैरवर्तनाचा असल्यामुळें व त्याच्या अनिश्चितपणा त्याचेमध्यें फसवेगिरीची छटा असल्यास नवल. हा ग्रह अनिश्चित व लहरी म्हणून फसवेगिरीचें वर्तन टेंवीलें असें म्हणवत नाहीं. जे अट्टल चोर ( Swindlers ) त्याच्या कुंडलींत हर्शल हा गुण दाखवीत असेल असें दिसत नसून उलट नेपच्यूनमध्यें हा गुण पुष्कळ प्रमाणांत आढळून येतो. फसवणिरीचें व गुप्तकारस्थानी वर्तन करण्यांत ( Deceptive tendency ) पाहण्यास मिळतें. प्रजापति स्वैरवर्तनाचा पुतळा असल्यामुळें, विवाह संबंधित बाबतींत याचें वर्तन विचित्र पाहण्यास मिळतें. कुंडली-मध्यें ज्या स्थानांत हा ग्रह आहे त्या स्थानासंबंधी त्यानें खळबळाट उडवून दिला नाहीं असें क्वचित घडतें. या ग्रहाचे अपूर्व मित्रत्व या संबंधी अनुभवाच्या अभावीं निश्चित मत देता नाहीं, तरी एखाद्याच्या कुंडलींत हर्शल ज्या राशींत असेल त्याच राशींत किंवा जवळजवळ त्याच अंशांत दुसऱ्याचा रवि-चंद्र किंवा लग्न असल्यास किंवा शुक्र असल्यास या दोघांत फार सख्य व स्नेह जुळतो, व स्त्रीपुरुषांच्या स्नेहाचें प्रेमांत रुपांतर होतें, म्हणजे हा एक नैसर्गिक आकर्षणाचा परिणाम आहे. आपल्याकडे विवाह ठरवितांना ही गोष्ट जरूर विचारांत घेण्याइतकी ती अत्यावश्यक आहे. हर्शलचा शुक्र-चंद्राशीं योग असतां एखाद्या स्त्रीस फूस लावून नेलेली आहे असें पहाण्यांत येत नाहीं. दोघे जाणूनबुजून प्रेमाग्नींत उड्या घेतात. उलट नेपच्यून मात्र तसें करू शकतो. विवाह न होतां प्रेमामुळें राजरोस छातीठोकपणें व मानें प्रजापति-मुळें घडून येईल तर फूस लावून अथवा थापा देऊन एखाद्या स्त्रीस फसवून पळविण्यांत नेपच्यूनचा हात असलेला पहाण्यांत येईल. सारांश Love Elopment ( खुषीनें अथवा स्वेच्छा म्हणून हात धरून राहणें-जाणें ) आणि The girl was seduced ( फूस लावून पळविणें ) या दोन वाक्याइतका या दोन महान भेद आहे.

नेपच्यून किंवा वरुण या ग्रहासंबंधी आज निश्चित असें काहीं प्रतिपादन करता येत नाहीं. पाश्चिमात्य ज्योतिर्विदांनीं याला आक्टोव्ह ऑफ व्हीनस ( तीव्र शुक्र ) म्हटलें आहे. हा ग्रह शुक्राचीं फळें मात्र ज्यास्त तीव्र प्रमाणांत दर्शवीतो. सर्वच ठिकाणीं शुक्राचीं शुभफळें जशीं दृष्टीस पडत नाहींत तसेंच या पण ग्रहाचें आहे. या ग्रहाचीं वाईट फळें शेंकडा ८० प्रमाणांत आमच्या नजरेस आलीं आहेत. या वरून हा शुभग्रह किंवा पापग्रह ज्याचें त्यानें अनुभवानीं ठरवावें. विषयसेवनेचे निंद्यप्रकार, फसवेगिरीचे धंदे, गुप्तकारस्थानें, मादक पदार्थ सेवनाचा अतिरेक वगैरे गुण नेपच्यून प्रभृती माणसांत असलेले आमचे पहाण्यांत आले आहेत. कित्येक अट्टल दारूबाज असतात तर काहीं कोकेन खाणारे अथवा मॉरफीयाचे इंजेक्शन व्यसनाकरिता

करून घेणारे पण आढळतात. नेपचूनच्या योगानें विषारी औषधें पोटांत गेल्यामुळें मृत्यू झालेले पहाण्यास मिळआत नेपचूनच्या योगानें चागले गुण उत्पन्न होतच नाहींत असें म्हणण्याचा आमचा मुळींच उद्देश नाही कुंडलींत नेपचून शुभसंबंधित असता जितकी चागली फळें दर्शविते त्याचेपेक्षा अशुभसंबंधित असता वाईट फळें ज्यास्तच दर्शवीतो व ती फार निंद्य प्रकारची असतात. एवढेंच येथें सांगावयाचें आहे. प्रत्येक ग्रहामध्यें शुभ आणि अशुभ असें दोन्ही ही धर्म असल्यामुळें व ते ज्या स्थानाचे अधिपति व इतर ग्रहानें संबंधित असे असतात त्या प्रमाणें शुभ किंवा अशुभफळें दर्शवितात या सर्वमान्य नियमाला नेपचून अपवादरूप आहे असें म्हणण्याचा आमचा उद्देश नाहीं. मानवी स्वभावाप्रमाणें आपण ग्रहांची शुभाशुभ कल्पना केली आहे व त्या दृष्टिनें बोलावयाचें असतां नेपचून हा शुभ आहे असें म्हणवत नाहीं कारण शुभफळे मिळण्यास हा ग्रह कुंडलीमध्यें चांगला बलवान व शुभसंबंधित असावा लागतो.

राशिफळापेक्षां स्थानफळें ही अधिक अनुभवास येतात. शुभग्रह ज्याज्याना-मध्यें असतो त्या त्या स्थानाची तो वृद्धि किंवा भरभराट करतो व अशुभ ग्रह त्या स्थानाची हानी करतो या सर्वसाधारण नियमानें नेपचूनची शुभफळें आमच्या अनुभवांत शेंकडा १० सुद्धा आली नाहींत. धनस्थानातील नेपचूनमुळें एकाद्याच्या सांपत्तिक स्थितीचा डोलारा पोकळ होऊन कोसळला नाहीं, किंवा अनेक भानगडींमुळें पैशाची हानी झाली नाहीं, तो चतुर्थात असता स्थावर मिळकतींचा बोजवारा उडाला नाहीं, पंचमांत असता संततिसंबंधी विचित्र अनुभव दीला नाहीं किंवा विषयवासनेच्या तृप्ती करितां निंद्य प्रकार घडले नाहींत असले अनुभव जर शुभ व उन्नति दर्शक असतील तर हा ग्रह गुरु किंवा गुरुचंद्रयुति प्रमाणें शुभ फल देणारा मानावा. या बाबींत अनुभवजन्य ज्ञान व कल्पना यांची ओढाताणही होणारच. येथें स्पष्ट सांगावयाचें असतां नेपचूनच्या फलादेशासंबंधी विचार करतेवेळीं तो फार जपून केला पाहीजे.

हर्षल व नेपचून यांच्या स्वगृहराशी कोणत्या व यांना कोणत्या राशी राशिमध्यें उच्चत्व प्राप्त होतें या संबंधानें अजून सर्व ज्योतिर्विदांची एक वाक्यता नाहीं हर्षल हा कुंभ, तुला, मिथुन या राशिमध्यें व नेपचून कर्क व मीन बलवान असल्याचें पाहण्यास मिळतें हे ग्रह अद्यापि अमुकस्थानाचे अधिपति आहेत किंवा अमुक एका स्थानावर अमुक एक राशि उदेत आहे म्हणून हे ग्रह त्या स्थानाचें अधिपति आहेत असें मानून फलादेश करण्याचा प्रचार फार क्वचित् पहावयास मिळतो. या ग्रहाच्या स्थानफलांचा व दृष्टिफलांचाच विचार करण्याची सर्व ज्योतिर्विदांची पद्धति आहे.

प्रश्न व मुहूर्त ज्योतिष या मध्यें या ग्रहांचा विचार करावा किंवा नाहीं असा नैसर्गिक प्रश्न उत्पन्न होणे साहजिक आहे. अमच्यामतें ज्योतिषशास्त्राच्या सर्व शास्त्र-

मध्यें या ग्रहाचा विचार होणें अवश्यक आहे. प्रश्न–मेदनीय किंवा राष्ट्रीय, व्यापार इत्यादिक ज्योतिषशास्त्राच्या सर्व अंगामध्यें या दोन ग्रहांचीं फलें पाहण्यास मिळाली आहेत. हे ग्रह कोणकोणत्या गोष्टींचे कारक आहेत हें लक्ष्यांत घेतलें असता या दोन ग्रहांचा फलादेश निरनिराळ्या ज्योतिषस्कंदामध्यें काय मिळेल याची कल्पना सहज कोणालाही करिता येईल

दिवसाच्या सरासरी एक तासाचा होरा या भागामध्यें या ग्रहाचा विचार होऊं शकेल किंवा नाहीं तसेंच या ग्रहानीं कोणते वार दर्शविले जातात वगैरे प्रश्न आज तुम्णें कठीण आहेत. हर्शेल हा रवीचा प्रतिग्रह मानला असतां रविवाराचा व नेपच्यून चंद्राचा प्रतिग्रह घेतला असता सोमवाराचा संबंध येऊं शकेल. अनुभवजन्य दृष्टीनें बोलावयाचें असता ज्यांच्या कुंडल्यामध्यें हर्शेल बलवान असता त्यास बुधवार व शनिवार चांगले जातात, व त्या दृष्टीनें या माणसास बुधाचा होरा विशेष महत्वाचा असणें शक्य आहे. नेपच्यूनचा जरी अनुभव पाहण्यांत नाहीं तरी सोमवार ( चंद्राचा होरा ) व शुक्रवार ( शुक्राचा होरा ) याचा संबंध पहाण्यास मिळावा

कुंडलींमध्यें हे ग्रह बिघडलें असता काय करावें, किंवा हे ग्रह अनिष्ट आले असता कोणत्या देवताची उपासना करावी वगैरे प्रश्न महत्वाचे आहेत व हें अनुभवानें सोडविलें पाहिजेत. आमच्यामतें प्रजापतिकरिता गायत्री मंत्रजप किंवा पुरश्चरण रविवार करितां सांगितलेली दानें, उन्हात तापलेल्या पाण्याचें स्नान करावें वरूणा करिता वरुणाराधना, उदकशांति, समुद्रपूजन, श्रीसूक्त अथवा लक्ष्मीसूक्ताचे पाठ, शंकरावर रुद्राभिषेक, शिवमंत्रजप–पुरश्चरण, चंद्राकरिता सांगितलेली दानें, गंध, कस्तुरी, जायफळ खसखस चंदनमिश्रित उदकानें स्नान करावें.

मंदगति ग्रहाचे षडाष्टक–नवपंचक किंवा द्विर्द्वादश योग महत्वाचे नाहींत असें वाटतें. षडाष्टक वगैरे खोटें आहे असें म्हणण्याचा उद्देश नाहीं. मंदगतिग्रहां-मध्यें हे योग फार दीर्घकाल राहणारे असल्यामुळें मंदगतिग्रहांमध्यें होणाऱ्या कोणत्याही दृष्टियोगाच्या बाबतींत फलांचा विचार फार जपून केला पाहिजे. दृष्टि योगांच्या बाबतींत फलज्योतिषवाङ्मय अजून अपुरें आहे यावनी किंवा पाश्चिमात्य ग्रंथांत वर्णन केलेल्या प्रत्यक्षस्नेहा ( त्रिकोण ), गुप्तस्नेहा ( तृतियैकादश ), गुप्तशत्रु ( केंद्र ), प्रत्यक्षशत्रुदृष्टि ( प्रतियोग ) व आर्य ग्रंथांतील सांगितलेल्या दृष्टि भिन्न आहेत. कुंडलिमध्यें दृष्टियोग अगदींच नसण्यापेक्षा दृष्टियोग असणें फार चांगलें असें सिद्ध होत आहे. बुध हर्शेलाचा योग नसण्यापेक्षा अशुभयोगहि असणें बरें, त्यापासून बुद्धिची तीव्रता वाढते व या दृष्टिनें ज्योतीर्विद सफारियल व प्रो. शंकरराव भिसे ( भिसोटाईपचे उत्पादक ) याच्या कुंडल्या पहाण्यात सर्वच

ग्रहांचे केंद्रयोग व प्रतियोग वाईट आहेत किंवा काय हा वाद अजून मिटाव याचा आहे.

सर्व ग्रहांचा स्थानपरत्वें फलांचा वाजवात हेच विचार करितां येतो तरी एकेका स्थानावर पांच पांच सहा सहा गोष्टींचा बोध होत असल्यानें त्या स्थानाच्या अमुक बाबतींत अमुक नक्की फल ठरविणें सध्यां फार कठीण जात आहे म्हणून स्थानफलात सूक्ष्मता येणें जरूर आहे, तिकडे संशोधक ज्योतिर्विदांनीं लक्ष्य देणें जरूर आहे. राशीफलाची पण तीच स्थिती असून प्रत्येक ग्रहाची विशिष्ट राशींत भिन्नभिन्न फलें अजून समजावयाचीं आहेत. राशीपेक्षा नक्षत्रानें ज्यास्त सूक्ष्मता येते परंतु यातही बरेच शोध व्हावयाचे आहेत. कांहीं नक्षत्रांमधील विशिष्ट फलें सध्या ज्योतिर्विदांच्या लक्षात आलीं आहेत. आर्यग्रंथकारांनीं ध्रुव-स्थिर, चर-चल अघ, उग्र क्रूर, लघु,क्षिप्र, मृदु मैत्र किंवा तिक्ष्ण दारुण वगैरे जे नक्षत्रांचे भेद केले आहेत तें कांहीं तरी मजून विचारणीय आहेत. प्रत्येक ग्रह द्रेष्काणनवमांशात कसा आहे हें पहाणें अत्यावश्यक असून पाश्चिमात्य व ज्योतिर्विदांनीं लक्ष या आर्यविभागांकडे लागलें आहे. भवरागिमहाची राशीफलापेक्षा द्रेष्काण नवमांश फलाकडे लक्ष्य दिलें पाहिजे. राशीगत प्रत्येक अंशापरत्वें ग्रहफलनिरीक्षण करता येईल तर फलाची सूक्ष्मता ज्यास्त निश्चित होईल असा प्रयत्न पाश्चिमात्यांनीं व आपल्याकडे श्रीयुत रा. रा. विष्णु गोपाळ नवाथे यांनीं केला आहे, व त्याची अंशयश विभाग पद्धति कांहीं अशीं तत्वास घरून आहे. मेषाचा पहिला अंश मेष, वृषभेचा पहिला अंश वृषभ अशी ती क्रमवार गणना आहे व मेषचे १२ अंश एवढी १२ राशीला दील्यावर १३ वा २६ वा पण अंश मेषचाच येतो अशी ती गणना आहे. ॲलन लिओची गणना वरच्यापेक्षां भिन्न आहे तरी ती तत्वाला धरून आहे. प्रथमतः अग्नि पृथ्वि-वायु-जल या तत्वानुसार राशींचें वर्गीकरण करून नंतर राशीच्या अंशांश त्याच तत्वाच्या चर राशीपासून आरंभ केला आहे मेष-सिंह-धनू या अग्नि-राशि आहेत, या तीन राशींचा आद्यांश चरामिराशि मेषपासून केल्यावर मग दुसरा वृषभ या प्रमाणें त्यानें क्रम ठेवला आहे; व हें वर्णन त्यांच्या ग्रंथांत (Astrology for all, part I) पहावयास मिळेल. याशिवाय चाल्डवल या क्लेअरव्हायन्टनें ( दिव्यदृष्टि असलेल्या माणसानें ) आपल्या 'राश्यंशलक्षण' ग्रंथांत (Degrees of the zodiac symbolized ) दीलेले अंशवर्णन व त्याच ग्रंथांत छापलेले एका मॅंच ज्योतिर्विदाचे अंशवर्णन विचार करण्याजोगें आहे. या शिवाय ब्रजन मॅकनॅडाम् हा ज्योतिर्विद राश्यंशफलें ठरविण्याचा हल्ली प्रयत्न करीत आहे, तो प्रसंगानें पुढचार पहावा

या ग्रंथांत ' जज ' या प्रकाशित ग्रहाबद्दल दिलेली माहिती चुकीची व ती सुधारणें अत्यावश्य आहे. आयसिस याळाच प्रथघार इजिज वर्फ आवर्त ' असें पृष्ट ३२ वर म्हणत असून तो मंगळ– गुरुमधील लघुग्रहापैकी दर्शविण्याकरिता योजला आहे असें केलेलें विधान खोटें आहे, हा प्रत्यक्ष ग्रह असून तो नेपच्युनच्या पलिकडे आहे असें मानतात परंतु दुर्बीणीच्या तडाख्यांत तो अजून सांपडला नाहीं. डॉ. श्रिमोनाईटच्या ' आरकानाचा ' व आमचा १०११२ वर्षें जो परिचय आहे त्या अर्थीन या ग्रहाचा दृश्यबिंबबरोबर असलेली फलें आढळली नाहींत, कदाचित नव्या अश्रुतिमध्यें असल्यास नकळे आयसिसचा शोध प्रथम जी. ई. सटलिफ या गणितज्ञ ज्योतिर्विदानें लावला व याबद्दल सविस्तर माहिती ' मॉडर्न अस्ट्रॉलॉजी ' नांवाच्या मासिकांत सन १९०६ साली प्रसिद्ध झाली आहे या ग्रहाला आयसिस म्हणतात व त्याचे 1818 असे इज शब्द पुन्हां पुन्हां लिहील्यानें–दशांश अपूर्णांकांत पुन्हां पुन्हां येणाऱ्या आंकड्यावर आवर्त चिन्ह करतात व तीला आवर्त संख्या म्हणतात–म्हणून या ग्रहास आवर्त नांव देतांना या ग्रहाच्याविशिष्ट गुणांचा व शोधकानें नामाभिधान करतेवेळीं विचारामध्यें घेतलेल्या इजिप्तपुराणांमधील आयसिस देवतेचा बोध होत नाहीं, व त्या दृष्टीनें हें नांव अयोग्य आहे हवपुत्राचें नांव दगड्या–धोंड्या ठेवण्याच्या रितीप्रमाणें प्रजापतीला वरूण तर नेपच्यूनला इंद्र व आयसिसला आवर्त म्हणावयाचे असेल तर म्हणावें, परंतु हा मार्ग शास्त्रीय नव्हे मिस्टर सटलीफ यानें इजिप्त पुराणांतील आयसीस देवतेचें नांव या ग्रहाला दीलें आहे व या देवतेची माहिती मॅडम ' ब्लावटस्की 'च्या ' आयसीस अनव्हेल्ड ' या ग्रंथांत सांपडेल मिस्टर सटलीफच्या या चार अप्रकाशित ग्रहांची माहिती खालीलप्रमाणें असून ते नेपच्यूनच्या पलिकडे आहेत.

अप्रकाशित चार ग्रह.

| अनुक्रम | नांव. | सूर्यपृथ्वीमधील १ अंतर प्रमाणे | प्रदक्षिणा काल वर्षें. | वार्षिक गति. अं. क. वि | १९०६ जानेवारींतील स्पष्टस्थिति. |
|---|---|---|---|---|---|
| १ | Isis | ५०-६०६ | ३६० | १-१०- ० | मेष ०-४६ |
| २ | Asiris | ९९-३४० | ९९०-११२९९ | ०-२१-४९ | तूळ ३-१-४९ |
| ३ | दीर्डेनार्ही | १५०-१७१ | २२००-३२७६८ | ०- ९-४९ | मीन २८-९-४९ |
| ४ | ,, | ३१७-५४७ | ५६५८-१३१५८ | ०- ३-४९ | कन्या २२-५-४८ |

या शिवाय अप्रकाशित ग्रहांसंबंधी पुष्कळ कल्पना आहेत चारुवेल क्ययर-म्हायलन्ट नेपचूनच्या पलिकडे Ovo व La Croix असे दोन ग्रह देतो. पहील्यास २६७ वर्षे सूर्य प्रदक्षिणेस लागतात व त्याची वार्षिक गति १ अंश १२ कला आहे तर दुसऱ्यास ३४० वर्षे ४२ दिवस लागतात व त्याची वार्षिक गति १ अंश ३ कला ३२ विकला आहे. १८२६ च्या नव्हेंबर ९ तारखेला 'ओओ' वृश्चिक १२-४३ अंशांत आणि 'लक्रॉ' हा मकर १२ अंशांत होता. ओओ हा दीर्घायुष्य व आकर्षण शक्ति देणारा आहे. हा ग्रह पृथ्वीप्रमाणें असून प्रसव, फलोत्पादक व कल्पनाप्रचुर असा शुभग्रह आहे. लक्रॉ या ग्रहांत मंगळामधील सर्व दैवी सामर्थ्य सांठविलेलें असून तो विजयी आहे. चारुवेलचा लक्रॉ व सटलीकचा आयसिस एकच वाटतात. यासंबंधी लिहित बसल्यास विस्तृत ग्रंथच लिहावा लागेल.

असो 'मीया मूठभर व दाढी हातभर' या म्हणी प्रमाणें प्रस्तुतचा प्रास्ताविक लेख लांबला आहे. हा ग्रंथ अगदीं नवीन अशा ग्रहांवर प्रथमच येत असल्यामुळें आमचा अनुभव प्रस्तावनेंत मांडला असतां तो पण उपयुक्त होईल म्हणून हर्शेलच्याच धर्मांप्रमाणें पूर्वसंप्रदाय सोडून जे विचार सुचले ते मांडले आहेत. आमचा अनुभव पण थोडाच आहे परंतु भावी पिढीला उपयुक्त व्हावा म्हणून दीला आहे. शारिरिक भौतिक मानसिक नैतिक-धार्मिक अथवा आर्थिकदृष्टया ग्रहांचे परिणाम राशीस्थान-परत्वें कसे होतात या गोष्टीला महत्व देऊन संशोधन कार्याचा प्रयत्न केला पाहिजे व मनांत येतें किंवा वाटतें म्हणून कांहीं तरी लिहिणें योग्य नाहीं. प्रत्येक गोष्ट अनुभवाला पटली पाहिजे व तेवढ्याकरितां व्यवस्थितपणें व विशिष्ट प्रकारच्या कुंडल्या माहितीसह संग्रहित होणे जरूर आहे. गेल्या १५ वर्षात पुष्कळ कुंडल्या प्रकाशित झाल्या आहेत परंतु त्यांचेसुद्धां वर्गीकरण झाले नाहीं, मग संशोधनाचा प्रश्न नकोच व त्या व्यतिरिक्त इतस्ततः भाराभर प्रकाशनानें कांहीं फायदा होणार नाहीं हें उघड आहे व तें प्रत्येक ज्योतिर्विद्याभ्यासीनें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

ज्योतिर्माला ऑफीस, दादर-मुम्बई नं.१४ \
ता ११ २-१९२३.

यशवंत केशव प्रधान
संपादक-ज्योतिर्माला.

# हर्शल ऊर्फ प्रजापति.

## भाग १ ला.

### प्रकरण पहिलें

#### बाह्य व स्थूल खगोल निरीक्षण.

हर्शल हा ग्रह नवीन असून शनीच्या पलीकडच्या कक्षेंतून सूर्याच्या-भोंवती फिरत असतो व तो नुसत्या नेत्रानीं स्पष्ट दिसणें अशक्य आहे तरी खगोल शास्त्रज्ञाला त्यानें बरोबर स्थळ माहीत असल्यास ६ व्या प्रतीच्या बारीक ताऱ्या एवढ्या आकाराचा तो दिसू शकतो हर्शल नावाच्या पाश्चिमात्य खगोलज्ञानें सन १७८१ च्या मार्च १३ व्या तारखेस हा विशिष्ट ग्रह मिथुन राशींत भ्रमण करीत असता आपल्या २२७ प्रभावाच्या दुर्बिणीच्या सहायानें पकडला, व त्याला युरेनस् ( सॅटर्न-शनीचा व जुपीटर-गुरूचा पितामह ) अशी संज्ञा दिली, परंतु हें नाव विशेष रूढ न होता त्याच्या शोधकाचेंच नांव या ग्रहास मिळालें, प्रसिद्ध ज्योतिषी कै. वा. रा. जनार्दन बाळाजी मोडक यांनीं या ग्रहाच्या गुणधर्मानुसार हर्शलास 'प्रजापति" हें नाव सार्थ दिलें असून तो याच नांवानें आपल्याकडे ओळखीला जाणें सयुक्तिक आहे ज्योतिर्गणिती रा. व्यंकटेश बापुजी केतकर हे या ग्रहास "वरुण" या नांवानें संबोधतात परंतु हें नाव हर्शलच्या प्रकृतिधर्माला सहन होणारें नाहीं

प्रजापतिस सूर्याभोंवती एक प्रदक्षिणा करावयास साधारणपणें ८४ वर्षे म्हणजे जवळ जवळ शनीच्या तिप्पट काळ लागतो सूर्यापासून प्रजापति १७८ कोटी २० लक्ष मैलांच्या अंतरावर आहे त्याचा व्यास ३५ हजार मैल म्हणजे पृथ्वीच्या पाचपट आहे या ग्रहावर पृथ्वीच्या ⅙ विरल द्रव्य आहे दुर्बिणींतून हा ग्रह हिरवट वर्णाचा दिसत असून त्यावर अनेक पट्टे उठलेले दृष्टोत्पत्तीस

घेतात. प्रजापति आपल्या स्वतांच्या भोंवती एक प्रदक्षिणा १० पासून १२ तासांत करीतो म्हणजे पृथ्वीच्या स्वताच्या प्रदक्षिणा कालाच्या अर्ध्या कालांत या ग्रहाची स्वताभोंवतालची प्रदक्षिणा पूर्ण होते, व गति फार शीघ्र असल्यामुळें या ग्रहाच्या ध्रुवाची टोकें प्रमणाच्या द्रुत वेगानें बरीच चापट झाली आहेत गुरु व शनी प्रमाणें या ग्रहावरील वातावरण मेघाच्छादितच आहे. प्रजापतीला चार उपग्रह उर्फ चंद्र आहेत व त्याच्या फिरण्याच्या कक्षा त्याच्या आसाशी फक्त आठ अंशाच्या कोनावर आहेत. त्याचप्रमाणें क्रांतिवृत्ताशीं या चंद्राशा ९८ अंशाचा कोन आहे. ही परिस्थिति प्रजापतीच्या धर्मोप्रमाणेंच विचित्रच आहे कारण या प्रकारामुळें सूर्यमालेंतील ग्रह व उपमहाप्रमाणें पश्चिमेंकडून पूर्वेकडे हे चंद्र न फिरता पूर्वेकडून पश्चिमेकडे उलट फिरतात व प्रजापतीवरी दीशाचा विचार करीता हे चंद्र तर दक्षिणेकडून उत्तरेस फिरतात. प्रजापति व त्याचे चंद्र यांच्या पातळात ८ अंशाचाच कोन असल्यानुळें प्रजापति व त्याचे चंद्र एकाच पातळींतून फिरत असल्यासारखें वाटतें व हा देखावा पहाणारास फारच चमत्कारिक दिसतो. प्रजापतिच्या चंद्रास प्रजापतिभोंवती एक प्रदक्षिणा करावयास अनुक्रमें २॥–४–८॥।–१३॥ अशे दिवस लागतात आपल्या पृथ्वीच्या चंद्राच्या एक प्रदक्षिणेस सुमारें २७। दिवस लागतात त्या मानानें पहाता प्रजापतीच्या चंद्राची गति फारच शीघ्र आहे. या चंद्रसंबंधानें अजून जास्त माहिति उपलब्ध झाली नाही परंतु शनि प्रमाणेंच प्रजापति ही सूर्यमालिकेप्रमाणें एक स्वतंत्र उपमालिका समजण्यास हरकत नाहीं. प्रजापतीची अमावास्या ३६६.९६ दिवसांनी होते. आपल्या भूगोलाच्या अमावास्येस सुमारें २९॥ दिवस लागतात त्याच्या बारपटीच्या कालानें प्रजापतीची अमावास्या होते. प्रजापतीला सूर्याभोंवती एक प्रदक्षिणा करावयास मध्यम मानानें ८३ वर्षे ११ महीने आणि ४ दिवस लागतात म्हणजे प्रत्येक राशि आक्रमण करण्यास प्रजापतीस, सुमारें सात वर्षे लागतात शनीला एक राशी आक्रमण्यास २॥ वर्षे लागत असल्यामुळें अन्म चंद्र राशीला पाडा करण्याचा शनीचा ७॥ वर्षांचा काल धरून "शनीची साडेसाती" म्हणण्यांत येते तर "प्रजापतीची एकविशी" पल्लजातकांत धरावी लागेल प्रजापतीचा वार्षिक मध्यम गति ४॥ अंश्व महिन्याचा मध्यम गति ·३५ अंश आहे. ११२ वर्षांनी प्रजापतीचा १ अंश संपात होतो

हा ग्रह फार दूर अंतरावर असल्यामुळें व शनीच्या प्रकाशाच्या ८० वा हिस्सा हा ग्रहाचा प्रकाश असल्यामुळें या ग्रहावरील सूक्ष्म द्रव्याचें परीक्षण करणें फार कठीण झालें आहे. परंतु प्रकाश लेखन कलेच्या सहाय्यानें पाश्चिमात्य

खगोल शास्त्रज्ञानीं गेल्या १०–१२ वर्षांत या ग्रहावरील मुख्य घटक द्रव्य शोधून काढिलें आहे. या ग्रहावरील सर्व वातावरण हायड्रोजन वायूचेंच आहे. ह्मणजे हाच वायु या ग्रहाच्या वातावरणाचा घटक आहे, नायट्रोजन, कॉर्बन किंवा ऑक्सिजन अथवा पाण्याची वाफ या पकी एकाद द्रव्याचें वास्तव्य या वातावरणात दिसून येत नाहीं. ऑक्सिजन ( प्राणवायू आपल्या भूगोलाच्या वातावरणाचा मुख्य घटक आहे ) हर्शेलवर तो मुळींच नाहीं, यामुळें प्राणीजनांस राहण्यास हा ग्रह पूर्ण नालायक आहे. प्राणीमात्राची वस्ती या ग्रहावर असणें अशक्य आहे हायड्रोजन व ऑक्सीजन वायू एकत्रावस्थेंत सलोख्यानें राहू शकत नाहीत त्याच्या एकत्रावस्थेंत थोडेसें घर्षण अथवा ठिणगी शिरली तर त्याचा फार मोठा स्फोटक भडका होतो हें सर्वांस सुरूपाच्या बंदुकीच्या दारू-वरून समजण्यासारखें आहे. ऑक्सीजन व हायड्रोजन या वायूमध्यें मोठी खडाजंगी उडविण्यास एक अग्नीची बारीक ठिणगी पूरी होते. हायड्रोजनसारख्या स्फोटक वायूची हर्शेल ही देवताच समजली पाहिजे अशा स्थितींत आपली ऑक्सीजन वायूची पृथ्वी या ग्रहाच्या वातावरणाकडे जाईल तर मोठा भडका होऊन तीच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होतील. उत्पत्ति–स्थिती आणि लय अशा विश्वाच्या तीन अवस्था असून त्याच्या ब्रह्म–विष्णु आणि श्री शंकर अशा देवता मानण्यात येतात. प्रजापतीचा गुणधर्म दारुण्या कार्यातत्वाकडे ह्मणजे पूर्वस्थितीच्या नाशाकडेच आहे हें यावरून सहज समजेल. याच तत्वाची–उत्पत्तीचा लय करणारी–देवता–श्रीशंकर ऊर्फ रुद्र आहे. व या देवताचा गुण-धर्म आणि प्रवृत्ति पहाता प्रजापतीच्या गुणधर्मांशी बरेंच साम्य असलेलें आढ-ळून येईल श्रीशंकराचा तिसरा नेत्र उघडला गेला तर सब जगाची राखरांगोळी होईल अशी पुराणांतर्गत वर्णनें प्रजापतीच्या गुणधर्मांचीच दिसून येतात शंकराचा ॥ तिसरा नेत्र ह्मणजे हाश्र्शेलनी प्रजापति तर नसेल ना ?

---

## प्रकरण २ रें.

### प्रजापतिची साधारण फळें.

॥ शनि प्रमाणें पापग्रह असून त्याच्या ठिकाणीं आकस्मिकपणा, अनिश्चितपणा, स्थित्यंतर अथवा क्रांति, कल्पनाचातुर्य, लहरीपणा, स्वार्थपरायणता असे गुणधर्म उत्पन्न करणाची प्रवृत्ति दिसून येते. काहीं ठिकाणीं प्रजापतीचा परिणाम विक्षिप्तपणा आणि अकस्मिकपणाच्या सहायानें स्पष्ट ओळखीता येतो. प्रत्यक्ष प्रमाण व अनुभव मिळविण्यास लागणारा दीर्घकाळ याच्या अभावीं फलशास्त्रांत या ग्रहाविषयीं विवक्षित आणि स्पष्ट आडाखे निर्णयात्मक तत्वावर अद्यून बसले गेले नाहींत. पाश्चिमात्य ज्योतिषाची धडपड या बाबतींत सारखी चालून राहिली आहे व त्याची उपलब्ध साधनें घेऊन चिकित्सकपणें फलांची अनुमानें आम्हास बसविणें भाग पडलें आहे. उठतां बसतां प्रत्येक बलवान् कुंडलींतील बलवान योगाचा अथवा साधारण जन्मकुंडल्यातील अनीष्ट योगांचा संबंध प्रजापतिशीं लावणाची प्रवृत्ति बऱ्याच वेळा दिसून येते ती प्रवृत्ति लेखकास हास्यास्पद वाटते अशा वेळी मेंदुवर या ग्रहाचा अमल होतो म्हणा किंवा अनुकरणाचा मोह दृष्टिस येतो म्हणा, परंतु वरील मार्गानें प्रजापतीच्या खऱ्यागुणधर्माचें अथवा फलाचें संशोधन होणार नाहीं. भूतकालीन अनीष्ट व चमत्कारिक अनुभव एकत्र करून त्यापैकी किती ठिकाणीं या ग्रहाचा संबंध लागतो हें चिकित्सक आणि सूक्ष्मदृष्टया पाहून मग या ग्रहाच्या फलाचा निश्चितपणा ठरविणें वरें, हा मार्ग दीर्घ प्रयत्न आणि त्रासाचा आहे एवढेंच नव्हे तर वरील मार्गानें जरी प्रजापतीच्या फलांचें निरीक्षण करून तदनुसार भविष्यकथन करण्यात आलें तरी त्या फलिताचे आडाखे साफ चुकविण्याची अनिश्चित फसवेगिरी या ग्रहाच्या अंगीं पूर्ण आहे यात संशय नाहीं. गोचरीचा हर्शल विचारामध्यें घेउन दैवी, गोंवर, वैधव्य, सापांचे रोग, अपघात, सट्टे, खून आणि आकस्मिक आपत्ति वगैरे फलाचें मूळ प्रजापति आणि वरुण-नेपच्यून या दोन ग्रहांच्या बुडाला हात घालून पहाण्याची हौस फलनिर्णयांत फसविल्या शिवाय रहाणार नाहीं.

एवढेंच लेखकाचें स्पष्ट मत आहे. त्यात वरुण-नेपच्यून हा आणखी एक गूढ ग्रह सापडल्यामुळें फलनिर्णयातील गूढत्व उकलण्यात ज्यास्तच जबाबदारी आणि अडचण उत्पन्न झाली आहे. प्रजापताचें गोचरभ्रमण फलितामध्यें अत्यंत महत्वाचें आहे हे निर्विवाद आहे परंतु प्रजापतीचा स्वाभाविक गुणधर्म ओळखून आणि ऐतिहासिक कालातील भ्रमणातील फलें पाहून मग त्याविषयीं फलाचा निश्चितपणा करणें श्रेयस्कर होय. या शिवाय दुसरा मार्ग सध्या नाहीं व लेखकानेंहि पण तोच धोरण स्वीकारलीं आहे आणि वरील मार्गानें विचार करण्यास सहाय होईल एवढ्याच तत्वावर या ग्रंथाची उभारणी केली आहे.

हर्शल ऊर्फ प्रजापति ह्या ग्रहाचा संबंध तर्कशास्त्रोंशीं बराच दिसून येतो म्हणजे बुद्धीवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. काहीं बुद्धिमान् लोकांच्या कुंडल्यांत हा ग्रह फार बलवान् असलेला पहाण्यात येतो स्वभावत हा ग्रह फार गूढ आहे व तो गूढशास्त्रें आणि विद्या यांचा कारक मोक्ता आहे मंत्र-तंत्र, जारण मारण उच्चाटण, प्रयोगसिद्धी, पशाचिकविद्या, मानसिक व अध्यात्मिकविद्या, मेस्मेरीझम-हिप्नाटिझम वगैरे बुरळ पाडणारी शास्त्रें पिशाच-संवाद आणि टेलीपथी वगैरे गूढ शास्त्राकडे प्रजापतीचा फार ओढा आहे असें विद्वान प्रतिपादन करितात. हा ग्रह शनिप्रमाणें वायूतत्वाचा असून कुंभराशि त्याचें स्वगृह मानण्यात येतें. वाफ व वाफ संबधीन वस्तू, द्रव्यपा हवा व वायू, वेल्साइन-सोडावाटर वगैरे फसफसणारे पदार्थ, आकाशयानें आणि आकाशस्थ वातावरण यांवर प्रजापतीचा अमल असतो असें समजण्यात येतें. गॅस व वाफेचा आणि विद्युच्छक्तीचीं यंत्रें व कारखानें, आगगाड्या, मोटारी हीं प्रजापतीचीं वाहनें समजतात, हर्शलच्या अमलाखालीं क्षय, देवी-गोवर, अपस्मार, वायूचे झटके, वेड, फेफरे, हिस्टेरिया ( हृदवायू ), वायु प्रकोप, अर्धांग वायू, प्लेग, कॉलरा बेशुद्धी इतके रोग आहेत आणि मारामारी, खून, चोऱ्या, दरोडे, आश्चर्य-चकित जागा आणि कत्तें स्मशान, मशाण स्थानें, गुप्तस्थानें-भूयारें-गुहा, जुगारस्थान हे प्रकार प्रजापतीमुळें घडतात असें पण समजण्यात येतें, यांतेंही प्रजापतीचा अमल कोणाकोणावर प्रत्यक्ष असूं शकेल आणि कोणाकोणावर अप्रत्यक्ष असतो त्याचाच विचार प्रथम केला पाहिजे.

विद्या आणि शास्त्रें या बाबतींत प्रजापतीचा विचार करिताना जेथें गूढत्वाच्या सदराखालीं येतें तेवढें प्रजापतीकडे ओढावयाचें हा दृष्टी बरोबर नाहीं. हर्शल हा ग्रह शनिप्रमाणें पूर्ण तमोगुणी आहे त्याच्यामध्यें सात्विक

# प्रकरण २ रें.

## प्रजापतिची साधारण फलें.

[illegible] शनि प्रमाणे पापग्रह असून त्याच्या ठिकाणीं अकास्मिकपणा, अनिश्चितपणा, स्थित्यंतर अथवा भ्रांति, कल्पनाचातुर्य, लहरीपणा, स्वार्थपरायणता असे गुणधर्म उत्पन्न करणाची प्रवृत्ति दिसून येते. काहीं ठिकाणीं प्रजापतीचा परिणाम विक्षिप्तपणा आणि अकस्मिकपणाच्या सहायानें स्पष्ट ओळखीस येतो. प्रत्यक्ष प्रमाण व अनुभव मिळविण्यास लागणारा दीर्घकाळ याच्या अभावीं फलशास्त्रात या ग्रहाविषयीं विविक्षित आणि स्पष्ट आडाखे निर्णयात्मक तत्त्वावर अद्यून बसले गेले नाहींत. पाश्चिमात्य ज्योतिषाची धडपड या बाबतींत सारखी चालून राहिली आहे व त्याची उपलब्ध साधनें घेऊन चिकित्सकपणें फलांची अनुमानें आम्हास बसविणें भाग पडलें आहे. उठता बसतां प्रत्येक बलवान् कुंडलींतील बलवान योगाचा अथवा साधारण जन्मकुंडल्यांतील अनीष्ट योगाचा संबंध प्रजापतिशीं लावणाची प्रवृत्ति बऱ्याच वेळा दिसून यते ही प्रवृत्ति लेखकास हास्यास्पद वाटते. अशा वेळीं मेंदुवर या ग्रहाचा अमल होतो म्हणा किंवा अनुकरणाचा मोह दृष्टिवर येतो म्हणा, परंतु वरील मार्गानें प्रजापतीच्या खऱ्यागुणधर्माचें अथवा फलाचें संशोधन होणार नाहीं. भूतकालीन अनीष्ट व चमत्कारिक अनुभव एकत्र करून त्यापैकीं किती ठिकाणीं या ग्रहाचा संबंध लागतो हें चिकित्सक आणि सूक्ष्मदृष्टया पाहून मग या ग्रहाच्या फलाचा निश्चितपणा ठरविणें बरें; हा मार्ग दीर्घ प्रयत्न आणि त्रासाचा आहे एवढेंच नव्हे तर वरील मार्गानें जरी प्रजापतीच्या फलाचें निरीक्षण करून तदनुसार भविष्यकथन करण्यात आलें तरी त्या फलिताचे आडाखे साफ चुकविण्याची अनिश्चित फसवेगिरी या ग्रहाच्या अंगीं पूर्ण आहे यांत संशय नाहीं. गोचरीचा हर्शेल विचारामध्यें घेउन दैवी, गौंवर, वैधव्य, सांथींचे रोग, अपघात, खटले, खून आणि अकास्मिक आपत्ति वगैरे फलाचें मूळ प्रजापति आणि वरुण-नेपच्यून या दोन ग्रहांच्या बुडाला हात घालून पहाण्याची हौस फलनिर्णयांत फसविल्या शिवाय रहाणार नाहीं.

एवढेंच लेखकाचें स्पष्ट मत आहे. त्यात वरुण-नेपच्यून हा आणखी एक गूढ ग्रह सापडल्यामुळें फलनिर्णयांतील गूढत्व वकलण्यांत ज्यास्तच जबाबदारी आणि अडचण उत्पन्न झाली आहे प्रजापताचें गोचरभ्रमण फलितामध्यें अत्यंत महत्वाचें आहे हें निर्विवाद आहे परंतु प्रजापतीचा स्वाभाविक गुणधर्म ओळखून आणि ऐतिहासिक कालांतील भ्रमणातील फलें पाहून मग त्याविषयी फलांचा निश्चितपणा करणें श्रेयस्कर होय. या शिवाय दुसरा मार्ग सध्या नाहीं व लेखकानेंहि पण तीच दीशा स्वीकारली आहे आणि वरील मार्गानें विचार करण्यास सहाय होईल एवढयांच तत्वावर या ग्रंथाची उभारणी केली आहे.

हर्शल ऊर्फ प्रजापति या ग्रहाचा संबंध तर्कशास्त्रांशीं बराच दिसून येतो ह्मणजे बुद्धीवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय रहात नाहीं. काही बुद्धिमान् लोकांच्या कुंडल्यात हा ग्रह फार बलवान् असलेला पहाण्यात येतो स्वभावत हा ग्रह फार गूढ आहे व तो गूढशास्त्रें आणि विद्या याचा परच भोक्ता आहे मंत्र-तंत्र, जारण मारण उच्चाटण, प्रयोगसिद्धी, पैशाचिकविद्या, मानसिक व अध्यात्मिकविद्या, मेस्मेरीझम-हिप्नॉटीझम वगैरे भुरळ पाडणारी शास्त्रें पिशाच-संवाद आणि टेलीपथी वगैरे गूढ शास्त्राकडे प्रजापतीचा फार ओढा आहे असें विद्वान प्रतिपादन करितात हा ग्रह शनिप्रमाणें वायूतत्वाचा असून कुंभराशी त्याचें स्वगृह मानण्यांत येतें. धाफ व वाफ संबधीन वस्तू द्रवरूपी हवा व वायू, वेल्झाइन-सोडावाटर वगैरे फसफसणारे पदार्थ, आकाशयानें आणि आकाशस्थ वातावरण यावर प्रजापतीचा अमल असतो असें समजण्यात येतें गॅस व वाफेचा आणि विद्युच्छक्तींचा यंत्रें व कारखानें, आगगाड्या, मोटारी ही प्रजापतीचीं वाहनें समजतात, हर्शलच्या अमलाखाली क्षय, देवी-गोंवर, अपस्मार, वायूचे झटके, वेड, फेंफरे, हिस्टेरिया ( हृदयवायू ), वायु प्रकोप, अर्धांग वायू, प्लेग, कॉलेरा वेशुद्धी इतके रोग आहेत आणि मारामारी, खून, चोऱ्या, दंड, आश्चर्य-चकित जागा आणि ठळें सराने, भयाण स्थानें, गुप्तस्थानें-भूयारें-गुहा, जुगारखाने हे प्रकार प्रजापतामुळें पडतात असें पण समजण्यात येतें, यांपैकी प्रजापतींचा अमल कोणाकोणावर प्रत्यक्ष असूं शकेल आणि कोणाकोणावर अप्रत्यक्ष असतो त्याचाच विचार प्रथम केला पाहिजे.

विद्या आणि शास्त्रें या बाबतींत प्रजापतीचा विचार करितांना जेवढें गूढावाच्या सदराखालीं येतें तेवढें प्रजापतीकडे ओढावयाचें ही दृष्टी बरोबर नाहीं. हर्शल हा ग्रह शनि प्रमाणें पूर्ण तमोगुणी आहे त्याच्यामध्यें सात्विक

## हर्शेल उर्फ प्रजापति.

गुणाचा अंश सांपडणें कठीण आहे. तो अरसिकपणा आणि विक्षिप्तपणा या दोन मुख्य गुणाचा कारक असून वायू तत्वाचा आहे एकदम क्रांति घडवून आणण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं असून ती क्रांति शांततेच्या तत्वावर नसून नाश तुफान -खळबळ-स्फोट अशा दुःखदायक तत्वाचा-संहार तत्वाचो आहे. त्याचा वर्ण फिक्का हिरवट आणि निरसर आहे याच दृष्टीनें हर्शेलच्या फलिताचा विचार केला पाहिजे य व्यतिरिक्त दुसऱ्या गुणधर्मांचें गूढत्व वरुण-नेपच्यून या ग्रहाकडे येते वरील दृष्टि कायम ठेऊन पाहील्यासर्व विद्या-शास्त्रे कला, वस्तु त्यामें हर्शेलच्या अमलाखाली येऊ शकणार नाहींत.

विद्या-शास्त्रें आणि कला याचा विचार केल्यास पैशाचिक सिद्ध साधनें आणि तामसिक शास्त्रें ( मंत्र-तंत्र-जारण-मारण, गारुडी विद्या ) प्रजापतीच्या अमलाखाली येऊं शकतात आजपर्यंत पिशाच्चबाधा आणि प्रयोग, जारण-मारणादि तमोगुणप्रधान साधनें आणि क्रीया विचार करितांना शनि-राहू-शुक्र या तीन ग्रहांसच ज्योतिर्विद महत्व देत होते, परंतु वरील गोष्टींचा विचार करितांनो प्रजापतीकडे विशेष लक्ष दीलें पाहीजे असें लेखकांस वाटतें. वरील गोष्टींकडे प्रजापतीचा प्रार कल असतो शुक्र हा ग्रह गुप्त कारस्थानें आणि कृत्यें याचा कारक आहे खरा परंतु दैत्याचा गुरू शुक्र या दृष्टया शुक्र स्वतां वरील प्रकारचें साधन अथवा कृति करण्यांत स्वार्थ-परायणता कधींही ठेवणारा नसून बहु जनसमाज हित अथवा लोकसमूहापैकी एका पक्षाच्या सामुदायिक-हितासाठी निंद्य व गूढ साधनें आणि कारस्थानें करण्याकडे त्याची प्रवृत्ति वळेल, शुक्र हा उदार आणि पक्षाभिमान-मतवादी आहे. त्याचा अंगी ही कृत्यें केवळ स्वार्थाकरितां किंवा व्याक्तावयवहितावरीतो करावयाव शील नाही. हें शील स्वार्थपरायण हर्शेलचें आहे, कारण तो अत्यंत स्वार्थी, एककल्ली असून भयंकर आणि निंद्यकृति गुप्तपणानें करून दाखविण्यात प्रवीण आहे. शुक्र आधश्रा-विश्वास ठेवणारा तर हर्शेल सतावरहि विश्वास न ठेवणारा आहे. शुक्राचें शील कारस्थाने करण्याचें आहे परंतु विश्वासघात करणाचें नाही, विश्वासघात करण्यात पुरुषार्थ मानणारा असा फक्त हर्शेल हा ग्रह आहे. निंद्यसाधनें आणि तामस कृति केवळ स्वतांच्याच निदृकृति-स्वलमे-करितां करण्यांत प्रजापति पुढे येणें सयुक्तिक आहे तर सामुदायिकहितास्तव आणि एकापक्षाची बाजू राखण्याकरितां सामुदायिक कारस्थानें आणि प्रतिकार हाणून पाडण्याची महर्षि शुक्राची आहे. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे अतीच हुशार सर्वोपरी

चंद्रगुप्ताच्या वेळेस राजकीयकारस्थानें ह्मणून पाढणाऱ्या आर्य चाणाक्याप्रमाणें शुक्राची वृत्ति आहे किंवा हल्लींच्या काळची जर्मन राजनीति पण हेंच दर्शवूं शकेल. हर्शलच्या स्वभावानें वरील बाबतींत असेंच उत्कृष्ट उदाहरण पहावयाचें असल्यास बादशहा औरंगझेब याचें आहे. चेटुक साधन, मुठ मारणें, पैशाचिक साधनें अथवा सिद्धि मिळविणें, तामसगुणप्रधानदेवीसाधनें संपादन करणें, पिशाच्च बाधा होणें वगैरे प्रकार शुक्रापेक्षा प्रजापतिकडे ओढणें जास्त समुचित आहे आणि अशा वेळीं राहु-शनीची दुक्कल जरुर विचारात घेतली पाहिजे, कारण वरील कार्यांत ही दुकल साथीदार किंवा साह्यकारी या नात्यानें पुढें येत असते.

बौद्धिकप्रगतिमध्यें हर्शलचा विचार, आचार व सूक्ष्म कल्पना अथवा अनुमान एवढया पुरताच केलेला बरा. या ग्रहाची तर्कशक्ति बिनचूक अनुमानें काढण्यात प्रवीण आहे. हर्शल हा जरी गूढ ग्रह आहे व त्याचें बिनचूक अनुमान करण्याची शैली अप्रतीम आहे तरि तो एकटा सर्व गूढ विद्या आणि शास्त्रें यास कारणीभूत होणार नाहीं, अशावेळीं त्या त्या विद्येच्या कारक ग्रहाची मदत त्याला अवश्यक आहे, एवढेंच नव्हे तर त्या त्या कारक ग्रहाशीं तो शुभसंबंधांत असेल तर त्या त्या विद्येच्या बाबतीत प्रगतीला तो फार सहाय्य करील. अध्यात्मिक शास्त्राशी हर्शलचा संबंध विशेष नसून नेपच्यूनचा संबंध विशेष पोषकपणाचा आहे. हर्शल मदतगार या नात्यानें थोडी फार मदत करील. मेस्मेरीझम आणि हिप्नॉटाझम या विद्या सेवपणें सुंगी आणणाऱ्या आहेत व त्या नेपच्यूनच्या अंमल खालीं आणणें संयुक्तिक आहे. एखादा मनुष्य पिशाच्यानें एकदम पछाडला जाण्यात हर्शलचा हात असूं शकेल परंतु वरील विद्या हर्शलच्या नव्हेत. ज्योतिष शास्त्र गूढ आहे परंतु ज्योतिष शास्त्राला हर्शल ग्रह एकटा कारणीभूत होणें अशक्य आहे. बुध-मंगळ अथवा शुक्राची परिस्थिति ज्योतिष शास्त्राची उत्पादक आहे व हर्शल फक्त त्या विषेत प्रगति करण्यास पोषक होईल टेलीपथी आणि पिशाचसंवाद ही विद्या हर्शलच्या अंमलाखालीं येणें जरुर आहे; कारण ही कला वायूतत्वाची गूढ शाखा आहे. वाफ आणि वाफेचीं यंत्रे याच्याशीं एकट्या प्रजापतिचा संबंध असणें असंभव दिसतें. यांत्रिककलेंत मुख्यतः वाफ-गॅस-विद्युत असे तीन भाग पडतात. या तीन शक्तींचा उपयोग यंत्रशास्त्रांत होतो, या तिन्ही शक्ति प्रजापतीनें खालीं येणें शक्य नाहीं. तिन्ही शक्तिंची उत्पत्ति बारकाईनें पाहून विचार करितां असें

आढळून येईल की या तिन्ही शक्तींच्या जुडाला मंगळा * सारखा उष्ण तत्त्वाचा ग्रह असावा लागतो त्याशिवाय या तीन शक्तींपैकी एकहि शक्ति निर्माण होणें कठीण आहे. वरील तीन्ही शक्तींपैकी गॅस शक्ति प्रजापतीच्या अंमलाखालीं येणें संयुक्तिक आहे व त्या दृष्ट्या पहाता विमानविद्या हर्शेलशीं थोडीबहुत संबंधित आहे परंतु मंगळाची जोड पाहिजे. विद्युच्छक्तीशीं हर्शेलचा संबंध लागू शकत नाहीं. लावावयाचाच असल्यास नेपच्यूनशीं संबंध लावणें जास्त चांगलें, पण अशा वेळीं मंगळाचें सहाय पाहिजे. गॅसॉअस शक्तीशीं मंगळ-शनि आणि प्रजापति यांचा संबंध आहे. एकटा हर्शेल गॅसॉअस शक्तीचा कारक होणार नाहीं. वाफेच्या शक्तीशीं मंगळ-हर्शेल व जल तत्त्वाचा ग्रह यांचा संबंध येतो. एकटा हर्शेल वाफेचा कारक होऊं शकणार नाहीं. विद्युच्छक्तीमध्ये दोन पोटभाग पडतात. घर्षणानें विद्युत उत्पन्न करण्यास मंगळ-नेपच्यून हर्शेल किंवा शनि पाहिजेत. स्थिर बॅटरीनें उत्पन्न होणाऱ्या विद्युच्छक्तीशीं मंगळ-नेपच्यूनाचाच संबंध येऊ शकतो व अशा दृष्टीनें शास्त्रीय चिकित्सक बुद्धीनें पृथक्करण करून या ग्रहाचें कारकत्व सिद्ध करून पुन्हा ते अनुभवाती खरें ठरल्यावरच फल संशोधन होऊं शकेल.

---

* याच प्रकार उष्ण तत्त्वाचा आणखी एक १३११ रसीद्-आवर्ट नांवाचा ग्रह नुकताच पाश्चिमात्य खगोलज्ञांनीं शोधून काढला असून तो दरसाल फक्त एक अंश या प्रमाणें ३६० वर्षांत तो बारा राशी आक्रमण करतो. तारीख २१ मार्च १९०६ रोजी हा ग्रह मेषेंत १ अंश पूर्ण करून होता व हल्लीं तो मेषेंतच १६ व्या अंशावर आहे. मंगळा प्रमाणें या ग्रहाचे गुणधर्म असून युद्धाला हा ग्रह विशेषत कारणीभूत होता. वैमानिकांच्या बळल्यात मंगळाचा या ग्रहाशी केंद्र योग झालेला पाहण्यात येतो. यावरून विमानविद्येशीं या ग्रहाचा संबंध असावा असें पाश्चिमात्यांचें म्हणणें आहे. रणसामुग्री व बॉम्बस्फोट यांचा हा ग्रह कारक आहे असें म्हणतात. आपल्या फलितांत सुधा हा कल्पित ग्रह दर वर्षास एक राशि या प्रमाणें भ्रमण करितो त्यापेक्षां वरील तिन्ही ग्रह किती दीर्घ काल फिरण्यास घेतात हें दिसून येईल. दरेक कुंडलीत या ग्रहास दाखल करून फल निरीक्षण करितां यावें म्हणून आवर्टाच्या भ्रमणस्थितीचें पत्रक शेवटी परि-शिष्टमध्यें दिलें आहे, तें बरेंच स्थूल आहे.

रसायन, गणित आणि युद्धकला या शास्त्रात मंगळ हा मुख्य ग्रह आहे व हर्शल वरील शास्त्राची प्रगति करण्यास मदत करूं शकेल एवढेंच; फसफसणारे सर्व पदार्थ प्रजापतिच्या अंमलाखालीं येणे बरोबर आहे. आकाशस्थ धातावरणावर प्रजापतिचा अंमल कांहीं अंशापर्यंत असतो असें वाटलुन आलें आहे वाहनामध्यें गॅस शक्तीनें चालणारी मोटारीसारखी वाहनें हर्शलच्या अंमलाखालीं येऊं शकतात; त्याचप्रमाणे वायसिकल व आकाशायनें हीं पण हर्शलचीं वाहनें असून चालविण्यास हरकत नाहीं. आगबोट सबमरीन वगैरे जलवाहनें हर्शलचीं नसून तीं नेपच्यून-मंगळाचीं अमलांत असें लेखकाला वाटतें. युद्धकलेंत विषारी गॅसशीं हर्शलचा संबंध आहे. स्फोटक दारू (ज्यांत पोटॅश कोरेट वगैरे स्फोटक पदार्थ येतात व एकदम भडका होतो) बॉबशेल्स वगैरे पदार्थांवर हर्शल-मंगळाचा अंमल असला पाहिजे. रसायनविद्येशीं एकट्या हर्शलचा संबंध येणे कठीण आहे; मंगळाची मदत गणित व रसायनाला पाहिजे. गणित व रसायन या विद्या उत्पन्न करणें मंगळांत सामर्थ्य आहे व त्यांत दांडगी प्रगति करून देण्यास हर्शल मदत करणारा आहे. विद्युच्छक्तीशीं हर्शलचा फार संबंध आहे असें कांहींचें मत आहे परंतु एकट्या हर्शलच्याअंगीं ती शक्ति नाहीं असें लेखकाचें स्पष्ट मत आहे. चित्रकलेचा कारक ग्रह शुक्र परंतु चित्रकलेंत हल्लीं अनेक भाग पडले आहेत. सिनेमॅटोग्राफी, लिथोग्राफी, फोटोग्राफी, पेन्टींग, स्कल्पटरींग, एनग्रेव्हींग, ब्लॉकमेकींग असा अनेक शाखा हल्लीं चित्रकलेंत आहेत, त्या सर्व शुक्राच्याच अंमलाखालच्या समजून चालणें कठीण आहे. फोटोग्राफींत शुक्र व हर्शल यांची मदत पाहिजे. शुक्र चित्रकलेची उत्पादक शक्ति किंवा कारकत्व म्हणून समजावी व नंतर इतर ग्रहांचे असे योग शुक्राशीं होतील तदनुसार निश्चित अनुमानें बसविलीं पाहिजेत. सिनेमॅटोग्राफींत शुक्राबरोबर नेपच्यूनची आवश्यकता फार आहे; असो. कलाकौशल्य व विद्या यांच्या शाखा, उपशाखा फार निघाल्या आहेत तेव्हां प्रयत्न अनुभवाव्यतिरिक्त अनुमानें प्रगट करणें योग्य नव्हे. लेखकानें विचार करण्याची दीशा दर्शविली आहे व त्याप्रमाणें अनेक कुंडल्या पाहून निश्चितपणा आणणें बरें, एवढेंच मला येथें सुचवावयाचें आहे.

रोगांचा विचारहि वरील प्रमाणेंच केला पाहिजे. हर्शलच्या अंमलाखालीं पुष्कळ रोग येतात व त्यांची लांबलचक यादहि देण्यांत येते हें बरोबर नाहीं. हर्शलच्या अंगी सरोसर स्वतंत्रपणें रोग उत्पन्न करण्याची शक्ति फारच थोडी आहे. फेफरें अथवा फिट्स् येणें, चक्कर येऊन पडणें, वात होणें अथवा

वेळें होणें या बाबतींत हर्शलचे परिणाम जितके स्पष्ट दिसून येतील तितके क्षय, हिस्टेरीया, अर्धांगवायू, आर्तवविकार वगैरे अनेक रोगांत दिसून येणार नाहींत. हर्शल हा ग्रह फार उत्तेजक स्वभावाचा आहे. कोणत्याहि रोगाचा कळस करणें यात हर्शलचे अंग फार असू शकतें व तितकेंच महत्त्व त्याला देणें बरें. क्षयाच्या बाबतीत चंद्राची स्थिति प्रथम लक्ष्यांत घेऊन मग प्रजापतीच्या परिस्थितीचा विचार केला पाहिजे. आर्तवविकारात चंद्र-मंगळ व सप्तमेश यास प्रथम प्राधान्य देऊन मग त्याची अनिष्टता प्रजापति किती वाढवील हें पाहिलें पाहिजे. देवी व गोंवर याच्या बाबतींत मंगळ उत्पात ग्रह समजून मग प्रजापतीचा विचार करावा हें बरें. वायूचे रोग मात्र हर्शल उत्पन्न करील परंतु अशा वेळीं सुद्धा त्याला दुसऱ्या ग्रहाची मदत लागतेच. आजारपणात वायू होऊन तुफान करणें अथवा बरळणें याला हर्शल फार मदत करितो यात संशय नाही परंतु गोचर चंद्राची परिस्थिति त्यालापण लागते इन्फ्लुएन्झा ही साथ उत्पन्न करण्यात प्रजापति बराच पुढें येऊ पहातो यांत संशय नाही परंतु अशा वेळीं त्याला मंगळाचें सहाय लागतेंच कॉलेरा हा रोग हर्शलमुळें फार फैलावला जातो ही गोष्ट खरी आहे, परंतु जलराशींत तो असून षष्ठस्थान त्यानें पीडीत झालें पाहिजे किंवा चंद्राशी त्याचा अशुभ संबंध असला पाहिजे हें उघड आहे. वरील प्रमाणें हर्शलचा विचार रोगाच्या बाबतीत करणें सयुक्तिक आहे प्रजापतीचे स्वतंत्र असे रोग नाहींत, असल्यास ते दोन तीनच होऊं शकतील.

स्वभावतः हा ग्रह फार तमोगुणी आहे आणि फार क्रूर असून त्याच्यात अनिश्चितपणा, अकस्मिकपणा व लहर हे तीन गुण प्रमुख आहेत, एवढें लक्ष्यात घेऊन या ग्रहाच्या फल निरीक्षणाकडे लक्ष्य द्यावें. त्याचप्रमाणें हा ग्रह फार विश्वासघातकी आहे फलांच्या बाबतीत कित्येक वेळा हा ग्रह फसगत करवितो, एक ठिकाणी आलेला अनुभव दुसऱ्या ठिकाणी त्याच परिस्थितिमध्यें तो देईल असें अनुमान करण्यांतसुद्धां हा ग्रह फसवितो तेव्हां विशेषच काळजी घेऊन फलें पहाणें बरें. हर्शलच्या अमलाखालची माणसें विश्वास ठेवण्यास पूर्ण नालायक असतात ही गोष्ट खरा आहे परंतु त्याला अपवाद आहे. कुंभेचा हर्शल लग्नी जर असला तर वरील अनुभव न मिळता उलट असा मनुष्य विलक्षण बुद्धीचा पहावयास मिळेल. विशेषत जलराशीत हर्शल वरील अविश्वासपणाचे अनुभव देईल व विक्षिप्तपणा पण उत्पन्न करील. अहाल राशींतील हर्शलच्या अमलाखालची माणसें अत्यंत तडफी असतात परंतु डोकें फिरल्यास आवेशांत मलतेंच करण्याचा पण प्रवृत्ति त्यांच्यांत असते

हा ग्रह शनि प्रमाणें पापग्रह आहे, व मिथुन, तूल आणि कुंभ राशींत तो असल्यास बल्वान् असून चागली फलें उत्पन्न करीतो, कुंभ राशींत तो फारच बलवान असतो व हीच राशि त्याचें स्वगृह आहे या ग्रहाच्याअंगीं तर्क शक्ति आणि कल्पना जबरदस्त असल्यामुळें वरील बौद्धिक राशि त्याला फार उत्तेजक आहेत. या ग्रहाची वृत्ति मात्र बुधा प्रमाणें सगतिसंस्कार प्रिय आहे. स्वतन्त्रीत्या स्वतन्त्र फलें हा ग्रह स्पष्टपणें देऊ शकत नाहीं. ज्या ज्या ग्रहाशीं त्याच्या योग होतो त्या त्या ग्रहाच्या सहवासाच्या परिणाम या ग्रहावर होतात आणि त्या ग्रहाच्या परीणामाला हा ग्रह उत्तेजक या नात्यानें फार मदत करीतो, किंवा त्या परीणामात विचित्र अनुभव देतो. ग्रहाप्रमाणें राशींच्या गुणधर्मांच्या संस्कारहि या ग्रहावर फार होतो. परिणामाच्या मुळच्या बीजाचा दाडगा विस्तार करणें, अथवा मूळचा परीणामाच्या कळस करणें हा प्रजापतीचा सहज धर्म आहे. स्वतंत्र फलें अथवा स्वतन्त्र परीणाम उत्पन्न करणात बुधाचें जितकें महत्व मानण्यात येतें तितकेंच महत्व या ग्रहाचें वरील बाबतीत मानणें बरें, मात्र बुधापेक्षा हा ग्रह दाडग्या सामर्थ्याचा आहे हें मात्र विसरता कामा नये रवि, मगळ, शनि हे ग्रह अगदी स्वतन्त्र फलें उत्पन्न करितात तशीं फलें हा ग्रह स्वतंत्रपणें उत्पन्न करणार नाहीं हा ग्रह बिघडलेल्या अथवा शुभ असलेल्या ग्रहाच्या परिणामास उच्छृखल करणारा, प्रोत्साहन देणारा, किंवा त्या ग्रहास प्रमोदित करणारा ग्रह असून अशा प्रत्येक परीणामात विचित्रपणा, गूढत्व, अकास्मिकपणा अथवा असामान्यता या पैकीं एकाद्या गुणाचें प्रतिबिंब तो पाडल्या शिवाय राहत नाहीं

# प्रकरण ३ रें.

## प्रजापति व इतर ग्रह.

बारकाईनें पाहिल्यास प्रजापतीचें एक्या बुधाशिवाय दुसऱ्या ग्रहाशीं फारसें पटत नाहीं, कारण हा ग्रह फार स्वच्छंदी आणि लहरी आहे व बुध ग्रह समजूतदार आणि शांतवृत्तीचा असल्यामुळें प्रजापतीलाहि तो पटवून घेतो. शनि वायुतत्वाचा व प्रजापतिहि वायुतत्वाचा म्हणून या दोन ग्रहांची फार मैत्री असावी असें अनुमान अनुभवांतीं खरें ठरणारें नाहीं दोन्ही ग्रह पापी वृत्तीचे व दुष्ट स्वभावाचे असल्यामुळें ते जरी समानगुणधर्मीय असले तरी अनुकूल परिस्थितिपुरतेंच त्यांच्यांत सख्य रहावयाचें व उलट्या परिस्थितींत दोघांच्या दुष्टपणाचा कळसच व्हावयाचा हें उघड आहे; व अशावेळीं एकाच्या दुष्टपणात दुसऱ्याच्या दुष्टपणाची भर पडून अनीष्टपणाच वाढणार असें दिसून येईल. त्यातल्यात्यात एकाच्या अंगी विचित्र लहर आणि अनिश्चितपणा जर वास करीत आहे तर त्याचें दुसऱ्याशी केव्हा बिनसेल याचा भरवसा बाळगता येणें कठीण आहे.

शनिशी हा प्रजापति जर अशुभ* संबंधित असेल तर अनीष्ट फलांचे तडाखे फारच तीव्र असतात आणि शनि ज्या स्थानाचा स्वामी असेल किंवा शनि, प्रजापति ज्या स्थानात असतील तद्योदक गोष्टींत वरील फलांचा अनुभव मिळतो व अशा वेळीं जलराशींत अथवा जहालराशींत योग होईल तर फलांचा तीव्रता ज्यास्त वाढेल उदाहरणार्थ एखाद्याच्या षष्ठात शनि व सप्तमात प्रजापति आहे तर हा योग मुलता-मुलतीं, शत्रू, पत्नीसौख्य यास वाईट आहे व तोच शनि

---

* लेखन सौकर्य आणि संक्षिप्तपणा यासाठी शुभ संबंध व अशुभ संबंध किंवा पीडीत असे शब्द या ग्रंथात वापरले आहेत. शुभ संबंध म्हणजे दोन किंवा तीन ग्रहात ३।११, १।५।९, ३।९ असे योग होत असल्यास समजणें. अशुभ संबंध अथवा पीडित होणें म्हणजे ग्रहांमध्यें परस्पर १।७, ४।१२, १।४, २।१२ असे संबंध अथवा योग असले तर समजावें. हे संबंध दृष्टियोगाचे आहेत व ग्रहांप्रमाणें स्थानांसहि लागू आहेत. युति व प्रतियुति या योगांचा स्वतंत्र स्पष्ट उल्लेख जागजागीं केला आहेच

जर तृतीयेश असेल तर बंधुभगिनी सुखालाहि तो मारक होणारच; व याच दृष्टीनें प्रजापतीच्या फलांचा विचार करणें बरें. शनि–प्रजापति याच्यांतील अशुभ योग कैद, उंचावरून पडणें, जब्बर नुकसान होणें, खटले होणें, नोकरींत नेहमीं अपयश येणें या पैकी फलें अनुभवास येतात. त्यांतल्यात्यांत १।७; ४।१० हे योग चांगले नाहींत. शनि प्रजापतीची युति व प्रतियुति चांगल्यापेक्षां वाईट परिणामच जास्त उत्पन्न करते. बौद्धिक राशींतील युति मात्र चांगलीं फलें देतांनां आढळते. शनि व प्रजापति यांमध्यें जन्मतः अशुभ योग असेल व पुन्हां गोचरीनें अशुभ योग या ग्रहास होऊं लागतात तेव्हा त्या त्या स्थानाविषयीं फार वाईट फलें मिळतात. या दोन ग्रहातील अशुभ योगानें होणारें गोचर भ्रमण फार वाईट असतें. या दोन ग्रहांत शुभ योग असल्यास वरच्या उलट फलें मिळतात, तर्कशक्ति, गूढ विचारशक्ति, मार्मिक परीक्षण व अनुमान, कल्पनानाविन्य, नोकरी, कायदा यांत अप्रतीम प्रगति झालेली दृष्टीस पडते. कुंभ राशींत हर्शल शनीची युति उत्तम फलें देते परंतु तीलाहि स्थानमहत्व लागतेंच.

शनिपेक्षां प्रजापतीचें मंगळाशीं बरेंच वैर आहे. खुनशी व चाबटपणा कलहाची हौस, मारामारी व खून, तापटपणा व आवेगाचा अतिरेक, जाळपोळ व अपघात, रुधिरस्राव अशा प्रकाराचे परीणाम हर्शल व प्रजापति मधील अशुभ योग उत्पन्न करतात या दोन्ही ग्रहामध्यें शुभ योग झाल्यास महत्वाकांक्षा, दांडगा उत्साह व कामाची तडफ, मिलिटरी–सर्जरी–रसायन अथवा यंत्र विषेत उत्कृष्ट अशीं फलें उत्पन्न होतात. रोगाच्या बाबतींत या ग्रहांतील अशुभ योग देवि–गोंवर, दाहअग्न्यविकार, इन्फ्लुएंझा उत्पन्न करितात; त्या प्रमाणें ऑपरेशन करण्यांत येणाऱ्या रोगाची उत्पत्ति या योगातहि असते. एकवेळ शनि–प्रजापति मधील अशुभ योग पुरवतो परंतु मंगळ–प्रजापती मधील अशुभयोग अत्यंत घातुक आहे. प्रजापति व शनि मधील योग दीर्घकाल टिकतो तर मंगळ प्रजापतिमधील योग अल्पावधीचा पण फारच तीव्र फलें उत्पन्न करतात. प्रजापति क्रूर, स्वतंत्र लहरीचा आणि अत्यंत कपटी आहे तर मंगळ क्रूर, हट्टी पण मोकळया मनाचा आहे. एकाच्या क्रूर हट्टीपणाला दुसऱ्याच्या क्रूर लहरीपणानें वळण लावणें अशक्य आहे

प्रजापतीचें जलतत्वप्रधान ग्रहांशीं पण पटत नाहीं. एवढेंच कीं फलांची तीव्रता मंगळ–शनिपेक्षां कमी असते, जलतत्वाचे मुख्य ग्रह म्हणजे चंद्र व नेपच्यून होत. चंद्र आणि प्रजापति यांजमध्यें अशुभ योग असल्यास 'वात्या-

वस्थेत दुःख प्राप्त होतें; मनाचा हलकेपणा आणि क्षुद्रबुद्धि, चंचलता आणि उतावीळपणा, विक्षिप्तपणा आणि लहर, नेहेमीं रखडपट्टी व फिरत राहणें, बहुजनसमाजापासून त्रास, जलापासून अपघात, मातृसुखाची कमतरता, मातेस कष्ट अशीं फलें पहावयास मिळतात. चंद्र-हर्शेल युति अथवा प्रतियुति जन्मतः जड्राल राशींत अथवा तीव्र नक्षत्रात झाली असेल तर प्रसुतीचा व लहानपणाचा काल मातेला हटकून अनीष्ट जातो व बालकाची प्रकृति पण अनीष्ट होते. मातेला वायुचे झटके अथवा वात होणें अथवा मूर्च्छा होणें हीं फलें कांहीं ठिकाणी पहावयास सांपडतात. चंद्र व प्रजापति यांमधील शुभ योग समाजसेवेकडे प्रवृत्ति वळवितो व नवा उत्साह दरेक कामात राहतो. चंद्र प्रजापतीचा अशुभ योग १।४।६।८।१२ या स्थानात होणें, अथवा क्षीण चंद्र वरील स्थानांत असून तो प्रजापतीनें पीडीत होणें चागलें नव्हे. क्षय आणि हृदय विकार उत्पन्न होतात. चंद्र प्रजापतीच्या शुभ योगापेक्षा अशुभ योगाचीं फलें फार तीव्र असतात.

प्रजापति व बुध याच्यामध्यें साधारणपणें मित्रत्वाचा संबंध असल्या मुळें या दोन ग्रहांमधील युति अथवा प्रतियुति अगदीं अनीष्ट फलें उत्पन्न कर-णारी नसून कित्येक वेळेवर ( बौद्धिक राशीत असता ) बौद्धिक सामर्थ्यास उलट पोषकहि झालेली पहावयास सांपडेल. या दोन ग्रहांमधील अशुभ योग मज्जातंतुगतविकार, मेंदूचा ढिलकसपणा अथवा मठ्ठपणा, अविचार, वाणीचा दुरुपयोग अथवा बाष्कळ बडबड अशी फलें उत्पन्न होतात. साधारणपणें या ग्रहांमधील ३।१२, ६।८, १।४ हे योग चागले नाहीत, व व्यापाऱ्यास अशा प्रसंगीं फारच नुकसान होण्याचा संभव होतो. बुध-प्रजापतिमधील बलवान शुभ योग वक्तृत्व फार चागलेंहि देतो, बहुश्रुतपणाला तो पोषकहि होतो. स्थानापेक्षां बुधप्रजापतिमधील योग राशीपरत्वें जे होतात तिकडे जास्त लक्ष्य देणें संयुक्तिक आहे. तृतीय स्थानातील कुंभेतील बुधहर्शलची युति अत्यंत महत्वाची आहे. या दोन ग्रहांतील शुभ योग ग्रंथकार ( विशेषतः निबंधकार ) व कवि यांस फार उपयुक्त आहे. त्यांस नव्या कल्पना, वाचनाभिरुची, स्वतंत्र विचार, लेखनकुशलता यांपासून फार लौकिक मिळणें शक्य आहे.

प्रजापति गुरुशीं सम अथवा उदासीन धरून चालण्यास हरकत नाहीं कारण या ग्रहांमध्यें स्वभावतः वैरहि नाहीं व विशेष मित्रत्व पण नाहीं. हर्शल व गुरु यामधील अशुभ योग सांपत्तिक अडचणी आणतो धर्मावर अश्रद्धा, नास्तिक्य, संततीपासून दुःख, विद्यार्जनाच्या मार्गात अडथळे अशी पण फलें

उत्पन्न होतात. रोगाच्या दृष्ट्या जलराशींतून गुरु-प्रजापतीचा होणारा अशुभ योग जलोदर उत्पन्न करूं शकेल. या दोन ग्रहांतील अशुभयोगापेक्षां शुभ-योगाची फलें फारच अप्रतीम दर्जाची असतात. संपत्तीच्या बाबतींत अनेक लाभ होतात, शारसाई अथवा लॉटरी या मार्गानेंहि धनलाभ एकदम होतो. हर्शल व गुरु याजमध्यें जन्मंत शुभ योग असून गोचरीनें पुन्हा गुरु हर्शलमध्यें जेव्हा जेव्हा शुभ योग घडत जातो तेव्हा तेव्हा कांहींना कांहीं लाभ होत जातात व पुढें पाऊल पडत जातें. धार्मिक वृत्ति वाढते, सार्वजनिक संस्था उभारण्याच्याकामीं अप्रतीम यश येतें, नावलौकिक वाढतो, नोकरींत व धंद्यात उत्कर्ष होतो. या दोन ग्रहांतील त्रिकोणयोग फार महत्वाचा आहे हर्शल व गुरूची युति व प्रतियुति कांहीं राशींत व स्थानांतच शुभ फलें देते त्या-व्यतिरिक्त अशुभफलेंच वांट्यास येतात

प्रजापति व शुक्र याजमध्यें गुरु इतकेंच ऐक्य समजावं, एवढेंच कीं शुक्र आणि प्रजापति याजमधील अशुभ योगांची फलें फारच तीव्र असतात, तितकी तीव्रता शुभ फलांत नसते शनिमंगळाच्या खालोखाल दर्जाची फलें या दोन ग्रहांमधील अशुभ संबंध उत्पन्न करितात. संसारसौख्याची हानी, चैन व विलासीपणा, छानछोकीपणांत काळाचा व पैशाचा व्यय, दारू वगैरे मादक पदार्थांची व्यसनें व त्यापासून अधःपात, नाट्यनुगार-शर्यति आणि तमाशें यांपासून होणारा नाश, व्यभिचारप्रवृत्ति, मत्सर, स्त्रीसमाजाकडून होणारा तिरस्कार व निर्भत्सना, पत्नीचें गर्भावर्तन अशा अनेक दुष्ट फलांची परंपराच लागते. रोगाच्या बाबतींत व्यसनातिरेक व व्यभिचारजन्य रोग उत्पन्न होतात. हर्शल शुक्राची युति आणि प्रतियुति अशुभ फलेंच जास्त उत्पन्न करते. शुक्र-प्रजापतीमधील शुभ योग प्रेम व प्रणयांत अप्रतीम यश, गायन-नाट्य आणि चित्रकला अशा ललितकलांत नैपुण्य, सृष्टिसौंदर्याचें मार्मिकपरीक्षण, स्वच्छता, सौंदर्य व नीटनेटकेपणाविषयीं दक्षता, नादलुब्धता, मनाची कोमलता असे धर्म उत्पन्न करीतात. ललितकाभिज्ञ लोक, नट, चित्रकार, कादंबरीकार यांस असले योग फारच उपयुक्त आहेत, त्याचप्रमाणें शुभ योग शर्यति-लॉटऱ्या व स्त्रीया यांपासून संपत्ति पण देऊं शकतो. हे योग मंत्र-तंत्र-साधनाविषयीं पण आवड उत्पन्न करवितात.

रवि हा आत्मकारक ग्रह आहे रवि प्रजापतीनें पडीत असणें चांगलें नाहीं जन्मभर त्रास होतो. सस्कृति व शील बिघडणें, पित्यापासून दुःख होणें,

पित्याला आपत्ति भोगण्यास लागणें, पितृसुखाची कमतरता, सरकारी नोकरी व अधिकारीवर्ग यांपासून त्रास होणें, राजकारणामुळें आपत्ति येणें असे परिणाम रविप्रजापतिमधील अशुभ योग उत्पन्न करितात रविपासून प्रजापति ६।८ स्थानीं असल्यास आयुष्यांतील उत्तरार्ध चांगला जात नाहीं. रवीच्या दशमांतील हर्शल चांगला नाहीं आयुष्यात बरीच क्रांति होते, त्यात वाईट फलेंच विशेष दृष्टीस पडतात. रवीच्या नवमांतील हर्शल भाग्योदय करणारा आहे व प्रजापतीच्या नवमांतील रवि राजापासून मानमरातब व भाग्योदय करूं शकतो. या दोन ग्रहांतील शुभ योग इट्यांगी लोकांस अत्यंत महत्वाचा आहे. रविहर्शलयुति थोड्या प्रसंगीं शुभ फलें देते परंतु दुसऱ्या सुखाचा नाशहि होतो. प्रतियुति चांगली नसून तापदायकच होते, पितृसुखाला ती फार विघातक आहे व राजसंकटाची ती जननी पण होते.

हर्शल राहू यांचें ऐक्य नसतें उलट फारच वाईट फलें कांहीं प्रसंगीं पहावयास मिळतात. अशुभ योग असल्यास सर्पदंशापासून व उपमृत्यूपासून भय असतें. त्याचप्रमाणें पिशाचबाधा, जारण-मारणापासून त्रासहि होतो. शुभ संबंध असल्यास, तामस साधनें व पैशाचिक क्रियाकिया करण्याकडे प्रवृत्ति उत्पन्न होते व त्यांत यशहि येतें. याशिवाय स्पष्ट अशी फलें अजून विशेष पहाण्यात आलेली नाहींत. राहू हा मारक ग्रह आहे व प्रजापति पण मारकच ग्रह आहे व या दोन ग्रहांमधील युति आणि प्रतियुति अत्यंत वाईट फलें उत्पन्न करणारी आहे. ११२।५।७।९।१० या स्थानांतील युति चांगली नाहीं, त्यांतल्या त्यात ती तीव्र नक्षत्रात जन्मत होणें अत्यंत वाईट आहे.

———

## प्रकरण ४ थें.

### प्रजापतीचा राशीपरत्वें विचार.

हर्शलचे परिणाम राशीपरत्वें कमी ज्यास्त तीव्र होतात असें दिसून आलें आहे म्हणून या प्रकरणांत थोडेंबहुत तसें निरीक्षण करण्यांत येत आहे. प्रजापतीस जलराशि फार अप्रीय आहेत; त्याचप्रमाणे अग्निराशीसुद्धां त्याला चांगल्या नाहीत; फक्त वायुराशी प्रजापतीला फार प्रिय आहेत व त्यात तो असतांन पुष्कळ शुभ फलें उत्पन्न करितो. अग्निराशींत तो असल्यास क्रौर्य, दुष्टपणा, नैष्ठुर्य, जहालपणा, दांडग्या मनोभावना, विकाराची तीव्रता, अस्थैर्य, कलह, जाळपोळ, अपघात, क्रांति अशी फलें उत्पन्न होतात, अग्नि आणि वायु यांचा मिलाफ म्हणजे अग्नि संहाराचें माहेरघरच समजलें पाहिजे त्यात प्रजापतीवर हायड्रोजनसारखा स्फोटक वायूच आहे त्याला अग्निराशी मिळणें म्हणजे दांडगी क्रांतीच होणें असें समजावयास हरकत नाहीं. अग्निराशींतील क्रुर नक्षत्र प्रजापतीला फारच वाईट समजलें पाहिजे अनीष्ट फलाची तीव्रताच वाढेल. ज्याच्या लग्नीं हर्शल, मंगळ व शनीनें पीडीत आहे किंवा प्रजापति अग्निराशीस असून ६।७।८।१२ यापैकीं एखाद्या स्थानात असून मंगळ शनीनें दुषित असल्यास अशा लोकानीं वाफ आणि गॅसची यंत्रें व कारखाने यापासून अलिप्त राहणें बरें, अपघात होण्याचे फार संभव असतात. जाळपोळें, दुखापत अशी फलें अग्निराशिस्थित प्रजापतीची असतात; व ज्या स्थानात तो असतो त्या स्थानदर्शक अवयवास इजा होते. अग्निराशींतील प्रजापति मंगळानें शुभदृष्ट असून स्थानबलि असेल तर सर्जरी, रसायन, युद्धकला, यांत्रिक कारखाने यापासून मनुष्याचा फार उत्कर्ष पण होतो; अशी माणसें आपल्या सहाध्यायांस मागें रेटून पुढें येतात. अग्निराशिस्थित प्रजापतीचा/ज्या ज्या ग्रहाचा शुभयोग होतो त्या त्या ग्रहाच्या अंमलाखालची विद्या तो सदैव जागृत ठेवतो,व त्या त्या विद्येचा व्यासंग करावयास लावण्यास त्याला स्थानबलाची जरूरी असते.

मेषस्थ प्रजापति मस्तकावर फार परीणाम करील, शुभस्थितींत असेल तर बुद्धि फार कुशाग्र होते व ज्या त्या कामांत दांडगा उत्साह व तडफ दिसून येते म्हणून प्रजापति तृतीयेशानें पीडीत असेल किंवा तृतीयेश या प्रजापतीनें

पीडीत असेल तर उतावीळपणानें फार नुकसान होतें, मज्जातंतूवर फार परीणाम होतो, बुदिचा दुरुपयोगहि होतो, हाच प्रजापति मंगळानें दुषित असून ३।६।८।-१२ यापैकीं एकाद्या स्थानी असल्यास अपघात सूचवीतो; व हे अपघात मंगळाच्या धर्माप्रमाणें अग्नि व आघात या स्वरूपाचे असतात, मेष ही राशी जहाल आहे खरी परंतु या राशीचा धर्म हट्टीपणा व मानीपणा असा आहे व ही राशी प्रजापतीला चागली नाहीं. उतावीळणा, हुडपणा, दंभ व दुराभिमान, पोकळ डौल आणि पोरकटपणा असे सहज परिणाम मेषस्थ प्रजापतीचे आहेत.

मेषेपेक्षां सिंहस्थ प्रजापतीची फलें फारच तीव्र असतात. शुभस्थितीतील प्रजापतीचीं फलें आयुष्याच्या प्रगतीला फार पोषक आहेत. अशीं माणसें कर्तबगार निपजतात. औदार्य–धाडसीपणा–स्वातन्त्र्यप्रीयता–दृढ निश्चय–आत्मविश्वास दाडगे कार्यप्रवर्तक सामर्थ्य अशीं सिंहस्थ प्रजापतीचे शुभ धर्म आहेत. मेषेंत मविष्टपणा व अविचार दृष्टोत्पत्तीस येईल तर सिंहस्थ प्रजापतींत आत्मविश्वास, विचार गांभीर्य व प्रत्यक्ष कार्य करून दाखविण्याची हातोटी दिसून येते. सिंहस्थ* अशुभ संबंधित प्रजापति 'जठरासंबधीचे रोग उत्पन्न करवितो , पितृसुख देत नाहीं सिंहेचा प्रजापति तृतीय स्थानी असणें फार चांगलें व अशावेळा तो तृतीयेशानें शुभ संबंधित असणे फारच उत्तम समजावें, कर्तृत्व, पुढारीपणा, पराक्रम याला तो फार पोषक आहे चतुर्थांतील सिंहेचा प्रजापति दु खालाच फार कारणीभूत होतो, व अशावेळी तो चंद्र–रवि–चतुर्थेश यापैकी एकानें अशुभ संबधित असेल तर जन्मभर दु खाचीं मार्गे पद-रात टाकीत असतो. सिंह राशी फार जहाल आणि राशिचक्रातील फार बलवान राशि आहे, या राशींतील प्रजापति फार जहाल असतो व तो दशमस्थया-पासून अशुभ स्थानी किंवा दशमेश अथवा रवीनें अशुभ दृष्ट असणें चागलें नाहीं, राजकारण व राजसंस्थापासून फार त्रास होतो व मंगळ–शनींचा अशुभ योग या दु खाचा कळस केल्याशिवाय राहणार नाहीं.

धनराशिस्थित प्रजापति मेषेप्रमाणें तडफी व जहाल असतो. मर्दानी खेळाची आवड व त्यात नैपुण्य, उत्तम शारिरीक संपत्ति मिळविण्याची लालसा, व्यायाम करण्याची हौस, दवडण्याचा नाद अशी धनस्थ प्रजापतीचो शुभ फलें

---

* शुभ स्थिति याचा अर्थ ग्रह स्थानबलि किंवा लग्न चंद्र–रवि यांच्याशीं शुभ दृष्टि करणें असा धरावा.

आहेत. या राशींतील प्रजापति अशुभ दृष्ट ( विशेषतः शनि मंगळानें ) असतां वाहनापासून अपघात होतात, पायाला व गुह्यास इजा होते, रक्त अशुद्ध राहणें, पाय धनुर्वाताने धरले जाणें, सांधे दुखणें असे अशुभ परिणाम उत्पन्न होतात, व अशा स्थितींत तो ३।८ स्थानांत असल्यास काहीं तरी स्पष्ट आणि तीव्र फलें उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहींत. वरील राशीस्थित तृतीयांतील प्रजापति रक्तदोष आणि उष्णता यामुळें मज्जातंतूचे विकार उत्पन्न करितो. लग्नस्थ धनूराशींतील प्रजापति शरीरयष्टि उंच व कांटक देतो, अवयव लांबट असतात आणि वाहनांपेक्षां चालून मजल मारणें फार प्रिय वाटतें.

जलराशींतील प्रजापति पण अशुभ फलें ज्यास्त उत्पन्न करीतो व अग्निराशींच्या खालोखाल अशीं तीव्र फलें असतात. पाणी आणि वायू यांच्या संयोगानें वादळ, तुफान व खळबळ उत्पन्न होते तद्वतच जलराशिस्थित प्रजापतींचीं फलें पहाण्याकडे लक्ष्य ठेवणें बरें. स्थित्यंतरें व वारंवार होत असलेल्या घडामोडी जलराशींतील प्रजापति करीत असतो.

जलराशीं पैकीं कर्क राशी प्रजापतीला सगळयांत ज्यास्त वाईट आहे. बाल्यावस्थेंतील दिवस त्रासदायक जाणें, मातृसुखाची कमसरता, मातेच्या प्रकृतीविषयीं काळजी, मनाची चंचलप्रवृत्ति व क्षणिक बदलणारे विकार, चिडखोरपणा व तक्रारी स्वभाव, हृदय व फुफ्फुसांचे विकार ( हार्ट डीझीझ ) अशीं अशुभ फलें पहावयास मिळतात व फलांची ज्यास्त स्पष्टता चंद्राशीं ह्याच प्रजापति अशुभ संबंधित असल्यास आढळून येईल ही राशि अत्यंत चंचल व रंगेलि संस्कार प्रिय आहे, व या राशींतील प्रजापति रवि-चंद्र अथवा लग्नेश यांच्याशीं अशुभ योग करीत असल्यास त्या माणसावर आजूबाजूच्या परिस्थितीचा फारच परिणाम घडतो. मनाला चिंता विनाकारण लागते व मन फार दुर्बल बनतें. देतकरी व बागाईत वर्गास चंद्र-रवि किंवा शुक्रानें बिघडलेला कर्कस्थ प्रजापति फार नुकसान करणारा आहे.

वृश्चिक राशि संसर्गजन्य रोगाची जननी असून तीचा अमल गुह्येंद्रियावर आहे. ही राशि अत्यंत गूढ व खुनशी आहे. लग्नात वृश्चिकेचा प्रजापति असून बलवान् बुधाशीं त्याचा संबंध असेल किंवा बुध प्रजापति याची युति लग्नीं असेल तर मनुष्याला खुजेपणा प्राप्त होणे शक्य आहे. वृश्चिकेचा प्रजापति रविचंद्र व शनीनें अशुभ संबंधित असल्यास :चौर्यकायव्य, स्वभावाची गूढता, अंतर्यामी सूडाच्या कल्पना अशीं फलें उत्पन्न होतात. या राशींतील स्थानबलि व शुभदृष्ट

पीडीत असेल तर उतावीळपणानें फार नुकसान होतें, मज्जातंतूवर फार परीणाम होतो, बुद्धिचा दुरुपयोगहि होतो, हाच प्रजापति मंगळानें दुषित असून ३।६।८।-१२ यापैकीं एखाद्या स्थानीं असल्यास अपघात सूचवीतो, व हे अपघात मंगळाच्या धर्माप्रमाणें अग्नि व आघात या स्वरूपाचे असतात, मेष ही राशी जहाल आहे खरी परंतु या राशीचा धर्म हट्टीपणा व मानीपणा असा आहे व ही राशी प्रजापतीला चांगली नाहीं. उतावीळणा, हुडपणा, दंभ व दुराभिमान, पोकळ डौल आणि पोरकटपणा असे सहज परिणाम मेषस्थ प्रजापतीचे आहेत.

मेषेपेक्षा सिंहस्थ प्रजापतीचीं फळें फारच तीव्र असतात. शुभस्थितींतील प्रजापतीचीं फळें आयुष्याच्या प्रगतीला फार पोषक आहेत. अशीं माणसें कर्तबगार निघतात. औदार्य–धाडसीपणा–स्वातंत्र्यप्रीयता–दृढ निश्चय–आत्मविश्वास दांडगें कार्यप्रवर्तक सामर्थ्य अशीं सिंहस्थ प्रजापतीचे शुभ धर्म आहेत. मेषेंत गर्विष्टपणा व अविचार दृष्टोत्पत्तीस येईल तर सिंहस्थ प्रजापतींत आत्मविश्वास, विचार गांभीर्य व प्रत्यक्ष कार्य करून दाखविण्याची हातोटी दिसून येते. सिंहस्थ* अशुभ संबंधित प्रजापति अठरांसंबधाचे रोग उत्पन्न करवितो , पितृसुख देत नाहीं सिंहेचा प्रजापति तृतीय स्थानीं असणें फार चांगलें व अशावेळीं तो तृतीयेशानें शुभ संबंधित असणें फारच उत्तम समजावं, कर्तृत्व, पुढारीपणा, पराक्रम याला तो फार पोषक आहे चतुर्थांतील सिंहेचा प्रजापति दुःखालाच फार कारणीभूत होतो, व अशावेळीं तो चंद्र–रवि–चतुर्थेश यापैकीं एकानें अशुभ संबंधित असेल तर जन्मभर दुःखाचीं मापें पदरात टाकीत असतो सिंह राशी फार जहाल आणि राशिचक्रांतील फार बलवान राशि आहे, या राशींतील प्रजापति फार जहाल असतो व तो दशमस्थया॰ पासून अशुभ स्थानीं किंवा दशमेश अथवा रवीनें अशुभ दृष्ट असणें चांगलें नाहीं, राजकारण व राजसत्तेपासून फार त्रास होतो व मंगळ–शनींचा अशुभ योग या दुःखाचा कळस केल्याशिवाय राहणार नाहीं.

धनराशिस्थित प्रजापति मेषेप्रमाणें तडफी व जहाल असतो. मर्दानी खेळाची आवड व त्यांत नैपुण्य, उत्तम शारीरीक संपत्ति मिळविण्याची लालसा, व्यायाम करण्याची हौस, दवडण्याचा नाद अशी धनुस्थ प्रजापतीचीं शुभ फळें

---

* शुभ स्थिति याचा अर्थ ग्रह स्थानबलि किंवा लग्न चंद्र–रवि यान्याशीं शुभ दृष्टि करणें असा घरावा.

प्रजापति सर्जरी व रसायन या शास्त्रात अप्रतीम प्राविण्य देतो. या राशीतील अशुभदृष्ट प्रजापति मूत्राशय, गुह्येंद्रियें या संबधीचे रोग उत्पन्न करवीतो व तो ६।१०।८ या स्थानीं जर असेल तर अतिसार, संग्रहणी, कॉलेरा, मूळव्याध वगैरे रोग उत्पन्न करील.

मीनस्थ प्रजापति अशुभ संबंधित असेल तर जलापासून अपघात होतात. हा राशी जरा अनुकरणप्रिय आहे व या राशीतील प्रजापति अनुकरणात फारच नैपुण्य देणारा आहे. मीनस्थ दुसऱ्या ग्रहानें पीडीत प्रजापति आळस व अस्थैर्य देतो, पायास ईजा होणें, एक संन्यासीपणानें वागणें असे परीणाम दृष्टीस पडतात या राशीतील प्रजापति शुभ फलांपेक्षा अशुभ फलें ज्यास्त उत्पन्न करणारा आहे तो जर स्थानबलि असून गुरु शुक्र–चंद्र–रवी यानीं शुभ दृष्ट असेल तर मन फार कोमल राहतें, व कोमल वृत्तीचा चांगला परिपोष होतो, भक्तिरसाला हा योग उत्तम आहे. नादलुब्धता व एकच लहर आणि तंद्री असे शुभ परिणामहि दृष्टीस पडतील. मूकया जनावराबद्दल फार आवड उत्पन्न होते दीर्घ प्रयत्नाच्या बाबतींत हा राशी निरुपयोगी आहे व तेथें प्रजापति जर पीडीत असेल तर अनुकरण, शीघ्र संस्कार, आलस्य, विकारवशता अशी फलें आढळून येतील या राशीतील मंगळ प्रजापतियुति अथवा प्रतियुति विद्युच्छास्पिपासून ईजा करवितें. मीनस्थ शुभानें संबधित प्रजापति अद्भुत क्थानकें रचणें अथवा ती प्रिय असणें, अद्भुतकार्याकडे प्रवृत्ति होणें व त्यात विपरीत अनुभव येणें अशी फलें निर्माण करु शकतो त्याचप्रमाणें प्रजापति–शुक्रयोगामध्यें नेपच्यूनची भर पडल्यास गुंगी येणारी मद्यप्राशनवगैरे व्यसनें पण लागतात मीनस्थ प्रजापति शनिग्रहानें अथवा मंगळानें अशुभ दृष्ट असता पायात काहीतरी व्यंग, पायास ईजा, चलण्याची पद्धत [illegible] वेढाईक व हास्यास्पद असे पण प्रकार नजरेस येतात व या फलाची स्पष्टता व्यवस्थानीं हुडून पहावयास मिळेल.

भूमीराशि हर्शेलास अप्रिय नाहींत त्याचप्रमाणें त्या विशेष प्रियहि नाहीत. या राशीतील प्रजापति एकटा असल्यास उदासीनच असतो व फलेंहि स्वतंत्र व तीव्र असतात. भूमीकंप होणें, जमीनीवर सोसाट्याचा वारा सुटला असता धुळीची वर्तुळें वरपर्यंत जाणें वगैरे गोष्टींशी प्रजापतीचा संबंध थोडा बहुत असतो. खनीज द्रव्यांपैकीं वायुतत्वाचीं द्रव्यें प्रजापतीच्या अंमलाखालचीं धरून चालावयास हरकत नाहीं आणि या द्रव्यात केरोसीन–पेट्रोलियम व ईंग्रेजीत ज्यास Mineral water म्हणतात तीं असतात. दगडी कोळसा, तेजाब

यांच्याशीं प्रजापतीचा कांहीं तरी संबंध असावा असें लेखकास वाटतें. व्यक्तिविषयक जन्मकुंडलींत पृथ्वी तत्वाच्या राशींत प्रजापति असून तो गुरु-शुक्र अथवा द्वितीयेश यानें शुभ संबंधित असल्यास आकस्मिक द्रव्यलाभ होणें शक्य आहे. ह्याच प्रजापति चंद्रशुक्रानें व चतुर्थेशानें शुभ दृष्ट असतां शेतकरी व बागाईतवाले यांस तो फायदेशीर होईल, त्यांतल्या त्यांत * वृषभेचा प्रजापति जरूर विचारांत घ्यावा. कन्या राशि हस्तकौशल्य व नकसवगैरेकामाकरितां प्रसिद्ध आहे व या राशींतील बुध शुक्र-शुभ संबंधित प्रजापति अशा कामामध्यें फारच उत्कर्ष करणारा आहे. वीणकाम, कलाबतू वगैरे हस्तकलाकुसरीचीं कामें या सदरांत येतात. पृथ्वीराशीं पैकी मकरराशी प्रजापतीला मुळीच महत्वाची नाहीं व मकरेंतील प्रजापति असून नसून सारखाच असतो; उलट पीडीत असल्यास फार त्रास होतो. अंधश्रद्धा, कर्मठपणा, एककली स्वभाव अशीं फळें उत्पन्न होतात.

सर्व राशींमध्यें प्रजापतीला बौद्धिक राशि फार प्रिय आहेत व त्याच वायुतत्वाच्या पण असल्यामुळें त्या राशींत हर्शेल फारच बलवान् असलेला दिसून येतो; आणि कित्येक वेळा फारच दाङगी शुभ फलें पण दृष्टोत्पत्तीस येतात. कुंभराशी तर प्रजापतीचें स्वगृहच समजण्यात येतें व तितका बलवान् तो या राशींत असतो. वायु तत्वाच्या राशि बौद्धिक सामर्थ्याच्या आहेत आणि प्रजापतीचा संबंधहि तर्कशक्तीशीं फार आहे. कल्पना, तर्क आणि अनुमान हे गुण विशेषत. हर्शेलच्या अंगीं आहेत व तो बौद्धिकराशींत असल्यास या गुणाचा परिपोष झालेला दृष्टीस पडतो.

मिथुन राशि विशेषतः पाठांतर व स्मरणशक्तिची द्योतक आहे व या राशींतील प्रजापति पाठांतर शक्ति दाङगी देऊं शकतो, व तोच बुधानें अथवा गुरुनें शुभ दृष्ट किंवा युत असल्यास आणि तृतीय स्थानांत योग घडून आल्यास असामान्य स्मरण शक्ति दिल्याशिवाय राहणार नाहीं. मिथुनेचा अंमल श्वासनलिकेवर आहे व या राशींतील बलवान हर्शेल प्राणायाम करणाऱ्या योगी लोकांस फारच उपयुक्त आहे. ह्याच प्रजापति पाठांतरें फार करवितो व ग्रंथच्याग्रंथहि मुखोद्गत होऊं शकतात, त्याचप्रमाणें पाठांतर करण्यास फार काळहि

---

* वृषभ राशि प्रजापतीची उच्चीची राशि मानण्याचा प्रघात कांहीं ठिकाणीं आहे परंतु त्याविषयीं लेखकाचें निश्चित मत नाहीं कारण प्रजापतीचें उच्चत्व कोणत्या राशींत असूं शकेल हें अनुभवाच्या कसोटीनेंच सिद्ध होणें बरें.

लागत नाहीं. मिथुनस्थ प्रजापति शनि-मंगळ-बुध अथवा चंद्रानें अशुभ संबंधित असल्यास दमा-श्वास किंवा कफप्रधान रोगाची वाढहि तो केल्याशिवाय राहणार नाहीं, त्याचप्रमाणें बुद्धि कुशाग्र असताना तीचा दुरुपयोग होणें, मेंदूवर विचारांचें फार दडपण पडल्यामुळें भ्रमिष्टपणा उत्पन्न होणें असेंहि परिणाम दिसून येतात. या राशींताल प्रजापति शुभ फलें ज्यास्त देतो.

तूल राशि मनाचा समतोलपणा ठेवून चिकित्सा करणारी दोन्ही बाजूकडे लक्ष ठेवून निरीक्षण करणारी आहे, मात्र मनाच्या बाबतींत थोडीशी चपलता पण ही राशि ठेवते. कोणतेंही अनुमान व मत समतोलपणानें प्रगट करण्यात तूलेचा प्रजापती मोठा पटाईत असतो, व हा गुण निबंधकार लेखक न्यायाधीश आणि उच्च अधिकारी वर्गाला फार अत्यावश्यक आहे, आरमालाच चमत्कारिक भासणारी अनुमानें विलक्षण रित्या खरा ठरविण्यात हा प्रजापति महत्वचा आहे अशा माणसाची मैत्री व्यवहारात फारच उपयुक्त व हितप्रद होते. तूलराशी शास्त्रीय आहे तरी तीचा कल विद्येपेक्षा ललितकलांकडे विशेष आहे तुलस्थ हर्शल अशुभ संबंधित असेल तर मूत्राशय, मेह रोग उत्पन्न होतात, वर्तन शुद्ध राहत नाहीं व चंद्र-शुक्राचा अशुभ योग व्यभिचार प्रवृत्ति उत्पन्न करणारा आहे, त्याचप्रमाणें तुलस्थ रवि आणि प्रजापतीची युति पंच-सप्तमात झाल्यास व्यभिचारी वर्तन हटकून घडण्याचा संभव असतो.

कुंभस्थ प्रजापति अत्यंत अवघड, गूढ अशा विषयांत बुद्धि चांगली चालविते. वेदांतासारखे गहन विषय फार प्रिय होतात. गणितासारख्या कठीण विषयांतहि विलक्षण नैपुण्य मिळतें कल्पनानाविन्य, गूढ व स्थिरविचार, खोल निरीक्षण असे परीणामहि दृष्टीस पडतात, आणि अशी माणसें बौद्धिक सामर्थ्यांत सर्वांच्या पुढें आल्याशिवाय राहत नाहीं. कुंभस्थ प्रजापतीला शनीच्या शुभ योगाची जोड मिळाल्यास गूढ विद्यत लोकोंतर येश मिळेल. राशीचक्रात ही एकच राशि अशी आहे का प्रजापतीविषयी शुभ फलेंच विशेषत देते व तमाम वर्गांच्या लोकांना कुंभस्थ प्रजापति पुढें आणणारा आहे मात्र त्याला स्थानबल व ग्रहाच्या शुभ योगाची अवश्यकता पाहीजे. वकील बॅरीस्टरवर्गास या प्रजापतीला शनाची जोड पाहीजे, लेखक व वक्ते यास बुधाचा योगही पाहीजे, गणित-रसायन वैद्य-डाक्तर यांस मंगळाच्या शुभ योगाची जरूर आहे व याप्रमाणें कुंभस्थ प्रजापतीशीं त्या त्या ग्रहांचे शुभ योग झाले तर त्या त्या वर्गाला फार उपयुक्त आहेत

---

## प्रकरण ५ वें.

### स्थानपरत्वें प्रजापतीचें निरीक्षण.

लग्नस्थ प्रजापति बराच महत्वाचा असतो; व तो जर ३।७।११ या राशींत असेल तर त्या मनुष्याची बुद्धि फार तीव्र असते व अशा वेळीं रवि-चंद्र अथवा बुध या ग्रहांनीं तो शुभ दृष्ट असलेला दिसून आल्यास दाडगी कल्पनाशक्ति दिसून येईल. लग्नस्थ प्रजापति शनिमंगळानें अशुभ दृष्ट असूं नये, दुखापत व संकटें फार येतात मस्तकाला फार त्रास होतो. तुलला प्रजापतीची माणसें फार हट्टी, आपलेच खरें करणारी, लहरी आणि स्वतंत्रप्रिय असतात. हा प्रजापति शुभ स्थितींत असलेला बरा, नाहीं तर जन्मभर संकटांची परंपरा लागते हा ह्र्षेल प्राय मजबूत शरीरयष्टि देतो व स्नायू फार बळकट देतो. लग्नस्थ प्रजापति असलेल्या लोकांचें आयुष्य विशेष घडामोडीचें जातें. याची अशुभ फलें म्हटली म्हणजे रीतरीवाज नसणें, क्षणोक्षणीं आचारविचारांत बदल राहणें, आत्मप्रौढता, विशिष्टपणा, निर्लज्जपणा अशीं आहेत. अस्थिर राशींतील लग्नस्थ प्रजापति असलेल्या माणसावर विशेष भरवंसा राखणें चांगले नाहीं. त्यातल्या त्यांत वृश्चिकेचा लग्नस्थ प्रजापति संगतीला फारच घातुक समजावा.

द्वितीयस्थ प्रजापति पैशाच्या देवघेवींत व उत्पन्नाच्या बाबतींत वरीच स्थित्यंतरें करीतो व कुटुंब (परके आणी आप्तस्वकीय) यापासून सुख मिळणें कठीण जातें व तो द्वितीयेशानें जर बिघडला असेल तर वरील फलें स्पष्टच दिसून येतात त्याचप्रमाण द्वितीयस्थानदर्शक बाबतींत न्यूनता असते द्वितीयस्थ प्रजापति अग्निराशींत असून द्वितीयेशानें अशुभदृष्ट असल्यास उष्णता व दुखापत यापासून नेत्रास पीडा होते, तोच जलराशींत असेल तर डोळ्यातून नेहमीं पाणी गळणें, प्रकाशाकडे पाहता न येणें, तोंडातून लाळ वाहणें, जीभ जड होऊन वाणींत दोष उत्पन्न होणें, रातांधळें प्राप्त होणें अशीं फलें दृष्टोत्पत्तीस येतात, व तोच मंगळानें पीडित असल्यास ऑपरेशन नेत्रास करण्याचा सुद्धां प्रसंग येणें शक्य आहे. द्वितीयस्थ बलवान राशींतील प्रजापति सप्तमेशानें शुभ संबंधित असल्यास विवाहानंतर श्वशुरगृहांकडून चांगली धनप्राप्ती होते; विवाहानंतर उत्कर्षहि होतो; परंतु तोच प्रजापति सप्तम-पंचम-दशम

आणि लाभेश यांनी अशुभ संबंधांत असेल तर प्राप्ती व धनसंचय या बाबतींत फार अपयश येते व मुद्दलाचा पाय खोलात अशी परिस्थिति सुद्धां उत्पन्न होते. अग्नि राशींतील द्वितीयस्थ मंगळप्रजापतियोग नेत्रास अपाय केल्याशिवाय राहणार नाही. हाच प्रजापति मिथुनेंत असून बुधानेंयुक्त अथवा शुभ दृष्ट असेल तर वक्तृत्वकलेंत अप्रतीम यश येईल. द्वितीयस्थ रविप्रजापतियुति वडीलोपार्जितसंपत्तीत फार घोंटाळे माजवितें. द्वितीयस्थ प्रजापति द्वितीयेश, रवि, चंद्र, गुरु, भाग्य लाभेश यांनी अशुभ संबंधित असल्यास अठरा विश्वे दारिद्य, कर्जबाजारीपणा, पैशाची नेहमीं टंचाई, उधळेपणा अशी फलें मिळूं लागतात, व अशा लोकांनीं पैशाचा व्यवहार करितांना फारच दक्षता बाळगणें अत्यावश्यक आहे.

तृतीयस्थ प्रजापती अग्निराशींत असुन मंगळानें पीडीत असेल तर रेलवे प्रवासपासून अपघात होतात. हा हर्शल चंद्राने बिघडला गेला असेल तर बुद्धीचा दुरुपयोग होतो, वाईट तऱ्हेच्या कार्यांत बुद्धि खर्च होते, मेंदुलाहि त्रास होतो, मनाची शांति राहत नाहीं. हाच प्रजापति बौद्धिक राशींत असून बुध-गुरुने शुभ दृष्ट अथवा युत असल्यास वाङ्मयसेवा, ग्रंथलेखन व्यवसाय आणि वाचन यात प्रगति करवीतो. तृतीयस्थ चरराशींतील प्रजापती प्रवास करवितो व चंद्राच्या योगाची जोड मिळाल्यास एक ठिकाणीं दीर्घकाल पाउल राहत नाहीं. तृतीयस्थ पीडीतप्रजापति भ्रातृकलह, भ्रातृभगिनिसुखाची कमतरता, शेजाऱ्यापाजाऱ्यापासुन त्रास, कान व मेंदूला इजा, प्रवासापासुन नुकसान अशी फलें उत्पन्न करणारा आहे. या स्थानाचा संबंध बुद्धि व मेंदुकडे असून त्यातील प्रजापति व इतर ग्रहांची परिस्थिति मनुष्याच्या बुद्धिचा परिपाक करणारी आहे.

चतुर्थस्थान प्रजापतीला चांगलें नाही, वाईट फलेंच ज्यास्त अनुभवास येतात. जल व अग्निराशींतील चतुर्थस्थप्रजापति मातेला कष्टप्रद असतो, स्वताला हृद्रोग चिंता लागते, माता व पिता यांचे स्वभाव जुळत नाहींत व दरामस्थनाला पीडा होते. चतुर्थांतील कुंभेचा हर्शल, असणाऱ्याची माता फार बुद्धिवान असूं शकेल, हेंच फल मिथून तूलेचा प्रजापति पण देईल. अग्निराशींतील प्रजापति मंगळानें अशुभ दृष्ट असल्यास किंवा चंद्राशीं त्याचा अशुभ योग झाला असल्यास मातेची प्रकृति चांगली नसते एकादा कायमचा रोग तीचा असतो त्यात प्रदर-हिस्टेरीया किंवा फिटस् वगैरे रोग प्रामुख्याने येतात. चतुर्थांतील जल व पृथ्वीतत्वाच्या राशींतील हर्शल चंद्र-शुक्रानें शुभदृष्ट असल्यास जमिनदार-

शेतकरीच । यास फायदेशीर होतो त्याच प्रमाणें भूमीराशीतील प्रजापति मग-ळानें शुभ दृष्ट असल्यास खनिज कारखानदारास किफायतशीर असतो या स्थानातील पीडीत प्रजापति उतार वयात फार त्रास देतो

पंचमस्थ बौद्धिक राशीतील प्रजापति बुद्धि, विद्या संपादनास फार मदत्याचा आहे तो संतति पण बुद्धिवान् देतो परंतु पंचमेशानेंहि तो शुभ संबंधित असला पाहीजे हा प्रजापति गूढशास्त्रें व विद्या देणारा असून मंत्र तंत्र विद्यासुद्धा देऊ शकतो, परंतु मंगळ-शनि-राहूनें पीडीत असल्यास या विद्या उलट अंगावर येतात पैशाचिकसिद्धिविद्या पूर्ण साध्य करावयास पंचमस्थ प्रजापतीस शनि–राहू अथवा शुक्राची पण मदत लागते पंचमातील हर्शल वरील पापग्रहानीं दूषित असल्यास विद्येचा दुरुपयोग नित्य कर्मांत करावयासहि तो चुकणार नाहीं, त्याच प्रमाणें संततीसुखाचे विचित्र अनुभव पण तो देईल पाश्चिमात्य ज्योतिषी पंचमावरून सोडत–लॉटरी–शर्यति पासून मिळणारा धनलाभ, मनोरंजक कला व व्यभिचारप्रवृत्ति–नाट्यप्राविण्य यांचा विचार पंचमावर करू पहातात तसें असल्यास पंचमस्थ अनुराधा–रोहिणी चित्रा नक्षत्रातील प्रजापति व्यभिचार प्रवृत्ति निर्माण करू शकेल किंवा नाहीं याचा विचारहि अनुभवानीं करण्याची सूचना आहे सुमतां पंचमस्थ प्रजापति असे परीणाम उत्पन्न करू शकणार नाहीं असें लेखकाचें मत आहे मंगळ-शुक्र व शनि यांच्याशी संबंध असावा लागतो तर वरील कांहीं अनुभव दृष्टोत्पत्तीस यतील या स्थानातील प्रजापति संततीसुखाला विघातक असतो व तो मंगळाच्या राशीत असणे फारच वाईट आहे

एकटा षष्ठस्थ प्रजापति रोगाच्या बाबतींत विचित्र अनुभव देऊ शकणार नाहीं रोगाच्या बाबतात रविचंद्राची स्थिति, मंगळ-शनि यांचा संबंध ज्या प्रमाणे विचारात घेणें अवश्य आहे त्याच प्रमाणे षष्ठेश, षष्ठस्थ प्रजापतीची राशि याचा । विचार करणें अत्यावश्यक आहे षष्ठस्थ प्रजापति रवि–चंद्र आणि शनि यांनीं अशुभसंबंधित असल्यास एखादा कायमचा रोग पाठीमागे लागतो, किंवा प्रकृतीला स्वास्थ्य मिळत नाहीं षष्ठस्थ प्रजापति विशेषत जठर व पंचेंद्रिय यावर अमल करणारा आहे व तो जर जलराशींत चंद्रानें पीडीत असेल तर खाण्यापिण्याविषयीं फारच काळजी घेतली पाहीजे कारण अपचनादिविकारापासून हटकून त्रास होतो मेद, उदर-रोग व अतिसार किंवा हगवण अशीं फळें पहावयास मिळतील व अशा

माणसानीं हलका आहार ठेवणें बरें. षष्टस्थ अमिराशीतील प्रजापति चांगला नाही., तो मंगळानें पीडीत असल्यास अपघातहि होतात. दुखापति होतात. शत्रूंच्या बाबतींत षष्टस्थ प्रजापति फार विचित्र अनुभव देतो मात्र शत्रूंचेंच बरेंच नुकसान करण्याकडे त्याची प्रवृत्ति असते. षष्टस्थ प्रजापति असलेल्या माणसांना गुप्त शत्रूही फार होतात व ते कित्येक वेळां न कळतां नुकसान करण्याच्याही खटपटींत असतात. अशा माणसानीं फार दक्षता व दुर्दर्शीपणा ठेवून वाळगणें अगदीं जरूर असते. षष्टस्थ बलवान् ग्रह दशमावर फार अंमल करीतात कारण दशमाचें त्रिकोण स्थान हें आहे. आर्यज्योतिषात षष्टस्थग्रह निरुपयोगी समजण्याची चाल आहे याचें कारण हे स्थान रोग-आजार व अपयशाचें आहे. परंतु शत्रूंच्या बाबतींत आणि दशमाच्या बाबतीत हें स्थान महत्वाचें आहे. या स्थानातील बलवान् ग्रह नोकरी-धंदा यासंबंधि पुष्कळ स्पष्ट फळें देताना आढळतात. डॉक्टर लोक व सर्जरी या धंद्याला षष्टस्थ मंगळ फारच मदत करीतो असें आढळून येतें व याच दृष्टीनें षष्टस्थ प्रजापतीचा विचार करणें जरूर आहे. उदाहरणार्थ दशमात मेषेत उच्चीचा रवि असून षष्ठांत धनूसारख्या जहाल राशीत प्रजापति रविशीं त्रिकोण करीत असेल तर तो प्रजापती रवीला व दशमस्थानच्या फलास अत्यंत पोषक व प्रोत्साहनकारकच होईल. षष्टस्थ मंगळ असलेल्या माणसाच्या स्वभावांत फारच तडक दिसून येतें " एक घाव व दोन तुकडे " अशाच तत्वाचा ते स्वीकार करतात व याला प्रजापतिची जोड मिळाल्यास जबरदस्त तीन फळे मिळतात षष्टस्थ प्रजापति बुधानें पीडीत असल्यास मज्जातंतूचे रोग उत्पन्न करील व मानसिकश्रमामुळें नासहि होतो. षष्टस्थ बलवान् प्रजापति शत्रुचें सदैव नुकसान करणारा आहे

सप्तमस्थ प्रजापति चांगला नाहीं हा प्रजापति अनेक दुष्परिणाम उत्पन्न करणारा आहे; व तो बलवान असला तर उत्तम नाहीं तर अति त्रास देणारा होतो; प्रतिस्पर्धी, कोर्टाचे दावे, समार वैवाहिक सुख यासंबंधि अनेक घोटाळे उत्पन्न होतात. प्रजापति स्वभावतः विवाहसुखाला फार प्रतिकूलच असतो व तो रवि ( स्त्रियांच्या बाबतींत )-शुक्र ( पुरुषांच्या बाबतात विशेष )शुक्र , चंद्र किंवा सप्तमेशानें विघटन्य गेल्यास अथवा अशुभसंबंधित असल्यास वैवाहिक सुखाचे कटु अनुभव दिल्याशिवाय राहत नाही, त्यातल्यात्यात तो अग्निराशींत असल्यास फलाची तीव्रता फारच मिळणार आहे. अकस्मिकरीत्या विवाद जमविणें, तो एकदम फिसकटविणें, पत्नीस एखादा कायमचा रोग जडणें, पत्नी सोडून स्वतंत्र राहणें तीचा स्वभाव तन्देवाईक असणें अशाप्रकारचे हे कटु

अनुभव असतात दाम्पत्याच्या बाबतीत ओगचे प्रतिस्पर्धी भेटून नुकसानहि फार करतात, त्याचप्रमाणे ल्मावर याच प्रजापतीची दृष्टि असल्यामुळे स्वतःच्या शरीरावर व स्वभावावर हे हा प्रजापति परिणाम केल्याशिवाय राहत नाहीं आग्र राशीतील सप्तमस्थमगळान पाडीत प्रजापति पत्नीची प्रकृति उष्णतेमुळें विघडविते तशात चंद्राचा किंवा अष्टमेशाचा अशुभसंबंध असल्यास तीला उष्णतेमुळें रज जावाचे विकारहि होतात पुरुषाच्या बाबतींतहि गुप्तागाचे रोग उत्पन्न होतात. हाच प्रजापति शुक्र शनि राहू यांना अशुभसंबंधित असेल, किंवा तो अनुराधा वगैरे नक्षत्रात असून सप्तमेशानें अशुभदृष्ट असून गुरुचा शुभ परिणाम होत नसेल तर पत्नीचें वर्तन मार्गाकडे झुकते किंवा स्वताचीहि प्रवृत्ति तशी होते सप्तमस्थ चरराशीतील प्रजापति फार फिरावयास लावतो हाच प्रजापति शनिशी शुभसंबंधित असल्यास गोष्टींत अप्रतिम यश मिळतें व समयसूचकता गुणहि दिसून येते. सप्तमात राशे प्रजापतीची युति, शुभ लागलीच पुढे व शनि मागें अशा परिस्थितींत व्यभिचार प्रवृत्ति, लेखकाच्या नजरेस आली आहे.

अष्टमस्थ अशुभदृष्ट प्रजापति मरणाची अनियमित व चमत्कारिक-स्थिती दर्शविणारा आहे ज्या ग्रहानें अष्टमस्थ प्रजापति अशुभ दृष्ट असल त्याचेच फळें मृत्यावस्थेत दृष्टोत्पत्तीस येतात वधिकेचा अष्टमस्थ प्रजापति अत्यंत वाईट समजावा कारण मृत्यू फारच वाईट आणि शोचनीय प्रकारें होण्याचा संभव असतो तीक्ष्ण राशीतील अष्टमस्थ प्रजापति मगळानें अशुभ संबंधित, प्रतियुतींत अथवा युतींत असेल तर अपघातानें मरण येते किंवा आत्म घात करुन घेण्याकडेहि प्रवृत्ति वाढविण्यास कारणीभूत होतो हें मृत्युस्थान असल्यामुळें आयुर्योतिपात फार वाईट म्हणले गेलें आहे परंतु अष्टमांतील बलवान् ग्रह वारसाई व गुप्तधनाच्या बाबतीत महत्त्वाचे असतात. अष्टमस्थ पृथ्वीराशींतील प्रजापति अष्टमेश, गुरु अथवा शुक्रानें शुभसंबंधित असल्यास भूमीगत द्रव्याचाहि लाभ होऊ शकतो, त्याचप्रमाणें मृत्युपत्र अथवा वारसाई हक्कानें अकस्मात मिळणारा लाभाहि अष्टमस्थ अथवा अष्टमाच्या त्रिकोण राशी-तील बलवान दर्शवू देऊं शकतो अष्टमांतील अत्यंत बिघडलेला व पापग्रहांनीं पिडीत असलेला प्रजापति अत्यंत वाईट असून वाईट प्रकारचें मरण देणारा आहे.

नवमस्थानातील बौद्धिक राशींतील प्रजापति उन्नतीच्या बाबतींत अत्यंत महत्त्वाचा आहे. बुद्धि ( तृतीय ) स्थान च्या समोरील हें स्थान असून शिवाय लग्न पंचमाच्या त्रिकोणांतील स्थान पण हेंच आहे या स्थानांतील ग्रहांचे

परिणाम १।३।५।७।११ इतक्या महत्वाच्या स्थानावर कमीअधिक प्रमाणान करीत असतात. तृतीयावस्थ मनुष्याच्या बुद्धिची कल्पना करिता येईल तर नवम वरून त्या बुद्धिचा प्रयत्न विकास किती झाला हें कळेल व त्यावरून मनुष्याच्य ईश्वराविषयी आणि आत्म्याची सद्गति समजून येण्यासारखी आहे. नवमस्थ हर्श गूढ विद्या व शास्त्रे यात प्रत्यक्ष मेहेनत करावयास लावील. नवमस्थ मोठेत अशुभ संबंधितप्रजापति तामसवृत्ति, बुद्धीचा नियकमांत उपयोग इत्यादि लहरीपणा, विवाहानंतर आप्तवर्गीयापासून त्रास, देवताद्वेष, धर्मभ्रष्टता नास्तिक्य, भूतपिशाच्च-जारण-मारणापासून आपत्ति असा वाईट फळे उत्प करणारा आहे. नवमस्थ बलवान प्रजापति बलवान ग्रहाशी शुभ योग करी असल्यास सिद्ध-साधन, योग व अध्यात्मिक विद्या याकडे प्रवृत्ति वळवील मात्र इतर ग्रहाच्या स्वभावाप्रमाणे दोशी ठेवील. सिंहेसारख्या सामर्थ्यवा राशींतील नवमस्थ प्रजापति रवीशीहि शुभ संबंधित असल्यास आरमोशी फारच लवकर तो करवील व हठयोग किंवा कर्मयोग याला बळकटी । आणील. या स्थानातील बिघडलेला प्रजापति मात्र जन्मभर दुःख देणारा होत व फार फिरविता. कर्क मीनेचा नवमस्थ प्रजापति चंद्राने अशुभसंबंधि असल्यास आयुष्याची खराबी करणारा आहे, भयाण स्वप्ने पडून त्यामुळे मना भीती उत्पन्न होणे, व पत भीतीनें खडबडुन ओरडणें, जागे होणे, बरळणे, रड असे मुद्दा प्रकार घडतात.

दशमस्थ प्रजापति मनुष्याला अनेक उलाढाल्या करावयास लावीतो अशी माणसें कधीही स्वस्थ बसून रहत नाहीत. दशमातील कुंभस्थ प्रजापि रवीने शुभ संबधात असल्यास राजकारण-राजसन्मान, राजनोकरी अथ अंमलदारी देतो. दशमस्थ सिंहेचा प्रजापति फारच उदपटी करविणारा अस व हे जर रवीनें शुभ दृष्ट असेल तर त्यात चांगले यशहि येते. प्रत्यक्ष हरयगाः व्यवहार करण्यात दशमस्थ प्रजापतीचे महत्व फार आहे व वयो वर्ष २४ ते ३ पर्यंतचा काल फार घडामोडीचा जातो. हा प्रजापति चंद्राने पीडील जा सुखाला विघातक होतो. दशमस्थ रविचंद्राने अशुभ दृष्ट प्रजापति पितृसुखा कमतरता देतो व त्यांत चमत्कारिक अनुभव पण देतो. दशमस्थ अग्नि राशींती अथवा तीव्र नक्षत्रातील रवि मंगळाने दुषित असलेल्या प्रजापतीकडून पित्याः अपघात होतात, तोच शनाने दूषित असल्यास पित्यावर संकटे येतात व स्वतांत राजकोपामुळें आपत्ति भोगण्याची पाळी येते. दशमस्थ स्व न द्विस्वभा राशीतील प्रजापति हजार धंदे व नोकऱ्या बदलावयास लावील, " एक धड ।

भाराभर चिंध्या " किंवा " अठरा धान्यांचें कडबोळें " अशी परिस्थिति होते. दशमांतील प्रजापति आयुष्यांत फारच स्थित्यंतरें घडविणारा आहे, तो शुभ स्थितींत असल्यास महत्पदाच्या शिखराला पोहोंचविणारा आहे व बिघडला गेल्यास अवनतीच्या खड्यातही लोटावयास तो कमी करीत नाहीं. दशमस्थानांतून प्रजापतींचें गोचर भ्रमण होत असेल व दशमांत असलेली राशि जशी असेल त्या प्रमाणें तेवढ्या कालांत कांहीं तरी स्थित्यंतर घडल्या शिवाय राहत नाहीं.

एकादशस्थ प्रजापति स्वकष्टार्जित प्राप्ती व लाभ या बाबतींत ज्याप्रमाणें विशिष्ट फलें देतो त्याप्रमाणें पंचमाच्या समोरचें हेंच स्थान असल्यामुळें त्यावरहि यान्या दृष्टीचा परीणाम फार होतो. हा प्रजापति ३।५।७।११ या स्थानाधिपतींनी अशुभसंबंधित असूं नये. ज्या भावेशाशीं त्याचा शुभ बलवान् योग होतो त्याच्या गुणधर्मानुसार लाभ होतात; व ज्या भावेशशीं तो अशुभ संबंधीत असेल त्या भावेशानुसार नुकसान होतें. संततीच्या बाबतीत एकादशस्थ पीडीत प्रजापति चागला नाहीं; त्याच प्रमाणें मातेचा अंतकालहि तो वाईट दर्शवीतो.

द्वादशातील रविचंद्रानें अशुभदृष्ट प्रजापति प्रवासापासुन नुकसान देतो; अशा स्थितींत मंगळ-शनानें तो दूषित असल्यास प्रवासात अपघात व संकटें देतो, राजसंकटामुळे कैदेत जाणें, सर्वांचे मोठाले अकस्मिक प्रसंग येणें व त्यामुळे सांपत्तिक स्थिति निकृष्ट दशेला येणें अशी फलें उत्पन्न होतात. जल राशीतील द्वादशस्थ प्रजापति ज्याच्या जन्म कुंडलीत असतो त्यानी जल प्रवास व जलाशयापासून दूर राहणें बरें. त्याचप्रमाणें तो अग्निराशीत असून मंगळ शनींनें दूषित असेल तर पायाला दुखापतहि होते किंवा पायांत व्यंगहि उत्पन्न होतें द्वादशस्थ प्रजापति ज्यांच्या जन्मकुंडल्यांत बलवान असतो अशी माणसें चालण्यावरूनहि ओळखूं येतात. चालताना अनियमित गतीनें पावलें टाकणे, तुर तुर पावलें टाकणे, दुडक्या चालीनें चालणें, चालतांना मर्कटचेष्टा करणें, पाय थोटे असणें, किंवा पायाला लाकडी जोड पाय असणें असले प्रकार आढळून येतील; त्याच प्रमाणें अशा मंडळींस एक तर फार जलदी चालावेसें वाटतें किंवा चालताना रोख्या कराव्याशा वाटतात. दशमाच्या तृतीयांत हें स्थान येतें यामुळें राजभय, राजदंड याचे कटु अनुभव द्वादशस्थ प्रजापति देऊं शकतो; त्याच प्रमाणें फार दूरचे प्रवासहि तो करवीतो. द्वादशावरून गुप्त शत्रूंचा विचार करावयाचा असेल तर द्वादशस्थ प्रजापति जरूर त्या बाबतीत लक्ष्यांत घेणें अत्यावश्यक आहे. भाऊबंद-प्रतिस्पर्धी-भागीदार यांच्याशीं हा प्रजापति शत्रुता करावयासहि लावतो.

---

अशा ग्रहास फलज्योतिषात घेऊन जातकात ज्यास्त क्लिष्टता वाढविण्याचारखें होईल तसाच प्रकार इतर लघु ग्रहाचा आहे. मंगळ व गुरु यामधील सर्व लघु ग्रह मिळून एक काल्पनिक इझिज नावाचा ग्रह पश्चिमात्य खगोलज्ञानी मान- ण्याला सुरवात केली आहे किंवा काय हें समजत नाहीं परंतु दर वर्षाला १ अंश चालणारा असा एक इझिज-आवर्त ग्रह-पाश्चिमात्य ज्योतिषी फलज्योतिषात घेऊ लागले आहेत हें सिमोनाइट याच्या ग्रंथांना या सर्वमान्य ग्रंथांत या आवर्ताचे दशम बिंदूशी होणाऱ्या योगाचे तर परिणाम देण्याचा प्रयत्न झाला आहे. नेपच्यून ऊर्फ वरुण सापडल्यापासून फार दिवस झाले नाहींत, त्याच प्रमाणें या ग्रहाची गति फार दीर्घ कालाचा असल्यामुळें त्याच्या गतींत गणित- मानानें प्रत्यक्ष फरक पडलेला आढळून येण्यास बराच काल लागणार तो पावेतों त्या बाबतीत आह्मास विचार करावयास नकोच

वरुण इ. स. १८४६ मध्यें सापडला तोंच पाश्चिमात्य ज्योतिषी त्याला फलज्योतिषात आणून बसवू लागले व त्या प्रमाणें त्याचें निरीक्षणहि होऊ लागलें. प्रत्यक्ष वेध आणि समर्पित कार्य करण्यांत आमची पीछेहाट असल्यामुळें त्यांच्याच फलिताची री सध्या ओढण जरी भाग आहे तरी लेखकानें पाश्चिमात्य व पौर्वात्य जातकाविषयी शक्य तितकी समतोल वृत्ति ठेवून चिकित्सक शास्त्रीय विवेचनाची जोड दीली आहे व कित्येक ठिकाणी आपलें स्पष्ट मतहि दीलें आहे. गेल्या ४१५ वर्षाचा स्वतःचा अनुभव याची जोड दीली आहे परंतु त्योंही, वेळा या दोन ग्रहाच्या फलनिरीक्षणाविषयी दांडगा प्रयत्न झाला पाहिजे अगदींच मराठी ज्योतिर्वाङ्मयात स्वतंत्र ग्रंथ म्हणून या दोन नव्या ग्रहाचीं सकलित फलें नाहींत म्हणून हा प्रयत्न ज्या प्रमाणें केला आहे त्याचप्रमाणें पुढील कार्याचा पाया म्हणूनहि या ग्रंथाचा उपयोग होणार आहे.

# प्रकरण २ रें.



## साधारण फलविवेचन व तुलना.



प्रजापति हा ग्रह असामान्यता, अकस्मिकपणा, विचित्रता व लहरीपणा या गुणांचा पोषक आहे, व तो वायुतत्वाचा असल्यामुळें कुंभराशि त्याच स्वगृह बनले. वरुण उर्फ नेपच्यून जलतत्वाची देवता असून तीच्याअंगी असामान्यता-अलौकिकता आहे व तीचें स्वगृह मीन ही जलराशि समजण्यात येतें. ग्रहाचा क्रम पहातां गुरूला धनू, शनीला मकर, प्रजापतीला कुंभ व वरुणाला मीन अशा रीतीनें त्या त्या क्रमानें राशि ज्या प्रमाणें देण्यात आल्या त्याचप्रमाणें राशीचे व ग्रहाचे गुणधर्म पहाता ही वाटणी गैर झालेली नाही असें पण आढळून येईल.

प्रजापतीच्या अंगी असलेले बरेचसे गुण शनीच्या गुणधर्माकडे कलते आहेत परंतु वरुणाचे गुणधर्म गुरु व चंद्र यांच्या गुणधर्मासारखे आहेत असें अगदी बारकाईनें पाहिल्यास आढळून येईल, शनि पाप व खलग्रह आहे तसाच प्रजापति पण पाप आणि खलग्रह मानावयास हरकत नाही परंतु वरुणाला पाप-ग्रह मानण्याची कांही ज्योतिर्विदांची कल्पना लेखकास समत नाही. वरुणाचें कांही अनीष्ट व दुर्धर अनुभव पाहून त्याला खल ग्रहाच्या पंक्तिमध्यें आणवून बसविण्यापूर्वी त्याच्या पापीपणाची तपासणी अनेक अनुभवाच्या कसोटीवर झाली पाहिजे. अनीष्टफलें पापग्रहच उत्पन्न करीतात असें नसून पुण्य व शुभ-ग्रह सुद्धा अनीष्ट फलें उत्पन्न करीतात व ते जर २।६।८।१२ स्थानात असले किंवा २।१२, ६।८; किंवा केंद्र योग करीत नेल्यास त्याचा अनुभवहि मिळतो तसाच विचार वरुणाच्या फलाच्या बाबतींत झाला पाहिजे. लेखकाला हलींच्या परीस्थितीत तो पाप ग्रह निदान वाटत नाही. या ग्रहाची चांगली फलें मिळ-ण्यास तो स्थान व राशिबलि पाहिजे किंवा इतर ग्रहांशी त्याचा शुभ संबंध असला पाहिजे. ज्या ग्रहास फिरण्याला दीर्घ काल लागतो त्याच्या फलिताचा विचार राशीपरत्वें न होतां अंशपरत्वें होईल तर ते ग्रह फलिताच्या कामीं बरीच मदत करतील यांत संशय नाही परंतु त्याला बराच कालावधी लागेल.

नेपच्यून उर्फ वरुण हा ग्रह प्रजापतिपेक्षां अत्यंत गूढ असून कोणत्याहि दृश्यवस्तूचें दृश्यआकारापूर्वीची अव्यक्तस्थिती कशी असावी याची कल्पना देणारा हा ग्रह आहे. व हाच मुख्य गुण लक्ष्यांत ठेवून त्याच्या फलांचें निरीक्षण झालें पाहिजे. मनुष्याला आत्म्याचें, आत्मसंस्कृतीचें अथवा शीलाचें अनुमान बांधण्यास जन्मकुंडलीत रवीची परिस्थिति पहाण्याचा प्रघात आहे. आमच्या मतें या बाबतींत रविपेक्षा वरुण ज्यास्त स्पष्टता व बिनचूकपणा देईल. असें वाटतें; व अशा प्रसंगीं हा ग्रह दृश्यार्धात आहे किंवा अदृश्यार्धात आहे, रवीशी त्यांचा कसा योग आहे, तो कोणत्या धर्माच्या राशींत व स्थानांत आहे, तो १।५।९ या स्थाना पासून कोठें आहे एवढें लक्ष्यात घेऊन विचार केल्यास वरील बाबतींचा खुलासा ज्यास्त स्पष्ट होऊं शकेल. मनुष्याच्या आत्म्याचा विकास, त्याची पुर्वजन्माची संस्कृति व शील, त्यानें सचीत व कर्म व पुढें त्याचें होणारा प्रगति यानें यथायोग्य परीक्षण वरुणाच्या स्थितीनुरूप त्यानींनें करिता येईल, त्यासंग मात्र दाखगा पाहीजे. सत्व-रज-तम या त्रिगुणात्मक प्रकृतीच्या मनुष्याच्या कुंडल्यात रवि व वरुण याची स्थिति पण त्रिविध असली पाहीजे. स्थानांचा विचार केला तर २।६।८।१२ ही स्थानें तमविध धरून चालल्यास, ३।७।१०।११ हीं स्थानें रजोधर्माची, १।५।९ सत्वप्रधान आणि चतुर्थस्थान लय अथवा मोक्ष असें जर धरीलें व मग वरुणाच्या स्थितीचा काहीसा विचार करीत गेलें तर बराच बोध विद्वानास झाल्याशिवाय राहणार नाही. स्थानाची त्रिगुणात्मक विभागणी ज्या प्रमाणें करावयाची त्याच प्रमाणें राशींची तशीच वाटणी करून वरील परीक्षणाला जोड देण्यांत येईल तर ज्यास्तच सुलभता प्राप्त होईल. ही सूचना लेखकानें केवळ जिज्ञासकपणाच्या पायावर अव्यक्त स्वरुपात ज्योतिर्विदापुढें मांडली आहे, व अनुभव आणि प्रत्यक्ष प्रमाणांचा आधार मिळाल्याशिवाय त्या कल्पनेला दृश्य स्वरुप येणें अशक्य आहे हें उघड आहे.

प्रजापतिप्रमाणें हा ग्रह गोचरीनें ज्या ज्या स्थानात येतो अथवा ज्या स्थानांत जन्मतः असतो त्या त्या स्थानांविषयी वाईट फलें विशेषत: उत्पन्न करीतो असें किरयेकाचें मत आहे, परंतु वास्तविक तशी स्थिति नसून उलट वरुण १।३।५।९।११ या स्थानात चांगला राशीवर्ती असेल तर शुभच फलें ज्यास्त उत्पन्न करवील असें आमचें मत आहे. प्रजापति हा तमोगुणी असून क्रांति तत्वाचा भोक्ता आहे तर वरुण हा दैवी ग्रह असून तो उत्क्रांति तत्वाचा भोक्ता आहे एवढा भेद नेहेमी या दोन ग्रहांमध्यें ठेवूनच विचार करणें

संयुक्तिक आहे. दोघेही असामान्य सामर्थ्याचे आहेत, दोघांतहि गूढता आहे, दोघातहि अलौकिकता आहे परंतु दोघातील हे समानधर्म निरनिराळ्या पायावर उभे आहेत. प्रजापति जडजगाशीं ( Materialism ) बराच निगडीत आहे; त्याला भौतिकवादहि प्रिय होईल तर वरुण अध्यात्मिकचैतन्याशी ( Spiritualism ) संबंध ठेवूं पहातो. दोघांमध्यें दांडगी जीवनशक्ति आहे. परंतु एकाच्या जीवनशक्तीचा उपयोग प्रत्यक्ष जगाच्या उलाढालींत भाग घेईल व त्यात क्रांति ( एकदम वातावरण क्षुब्ध होऊन बदल होणें या अर्थी [illegible] शब्द वापरला आहे ) तत्वाचे वास्तव्य दिसून येईल तर दुसऱ्याच्या जीवनशक्तीचा उपयोग गूढ-अज्ञात अशा प्रगतीला धरून उत्क्रांति ( शांतपणें व क्षुब्धता न होता समजूतदारी-ज्ञानाच्या जोरावर एकदम अथवा हळुहळु बदल होणें ) करण्याच्या कामी खर्च होईल असा या दोन ग्रहात सूक्ष्मतेचा भेद आहे. सामर्थ्याचाच विचार करावयाचा असेल तर वरुण प्रजापतिपेक्षा ज्यास्त सामर्थ्यवान आहे. कारण भौतिकवादापेक्षा अध्यात्मिकशक्ति केव्हाही ज्यास्त बलवानच राहणार प्रजापतिमध्यें शीघ्रसंस्कार हा गुण आहे त्याच प्रमाणें तो वरुणातही आहे परंतु एकाचा शीघ्रसंस्कार अविचारीपणाचा व उतावीळपणाचा असूं शकेल तर दुसऱ्याचा शीघ्र संस्कार समय व दुर्दर्शीपणाला चिकटून राहील. दोघाच्या दैवी सामर्थ्याचा विचार करितानासुद्धा वरील विचारसरणि ठेवावी लागेल. दैवी सामर्थ्यांत पहिल्याची साधनें तामसी अथवा राजस प्रकृतिधर्माला चिटकून राहूं पहातात तर दुसऱ्याची साधनें शक्य तितकी सात्विक प्रकृतीला चिकटून राहतील. दुसरा मोठा भेद दोघात आहे तो हटला म्हणजे प्रजापति स्वभावतः एकलकोंडा व कठोर-निर्दय-मनाचा आहे वरुणाची वृत्ति फार कोमल व प्रेमळ आहे, व त्याचे केव्हा तो एकलकोंडा न राहता समाज व जनसमूहातही वावरताना दृष्टोत्पत्तीस पडेल. एक बिघडला तर शनिप्रमाणें अनिष्ट आणि तीक्ष्ण फलाचे तडाखे मारतांना थोडीशी सुद्धा दया ठेवणार नाहीं, दुसरा बिघडला तरी तीव्र फलें देताना थोडी तरी दया हृदयात बाळगील. जातीचा विचार करिताना प्रजापति पुरुष ग्रह समजावा किंवा शनिबुधाप्रमाणें तो नपुंसक समजावा या विषयी स्पष्ट-मत निश्चितपणें देता येणें अशक्य आहे. परंतु लेखकाला तो पुरुष प्रकृतीचा असावा असें वाटतें. वरुणाच्या बाबतींत मात्र तशी अनिश्चितता नसून वरुण [illegible] स्त्रीग्रह मानावयास मुळीच हरकत नाहीं. वास्तविक पहाता हा ग्रह षड्वर्गादाच्या पलीकडच्या गुप्त धर्माचे आहेत. अशा गूढ व अज्ञात ग्रहास पुरुष-स्त्री अशी संज्ञा प्रत्यक्ष देणें कठीण आहे. जडदेह जोरदार आहे तोपर्यंत पुरुष-स्त्री

असे भेद त्यास लागू पडतात. परंतु त्या देहाचें लिंगदेहांत परावर्तन झाल्यावर हा भेद ज्याप्रमाणें राहू शकत नाहीं तें एक चैतन्यच समजलें जातें, तरी या दोन ग्रहांची स्थिति आम्हाला वाटते फलजातकांत व विशेषत प्रश्नजातकांत या दोन ग्रहांचे लिंगभेद मानणें जरूरच वाटल्यास प्रजापति पुरुषग्रह व वरुण स्त्रीग्रह असे धर्म्य चालविण्यास हरकत नाहीं व्यसनें या बाबतीतहि दोघांची तुलना करणें जरूर आहे. दोघांसहि व्यसनें प्रिय आहेत व दोघांचा अमलहि मादक पदार्थांवर आहे परंतु प्रजापतीचा अमल ज्या द्रव्यांत वायू-उष्णता वास जरूर आहे अशा स्पीरीटसारख्या द्रव्यांवर (दारू-ब्रँन्डी वगैरे) असें शकेल तर वरुणाचा अंमल ज्या द्रव्यांत घट्टता असेल असल्या मादक पदार्थांवर ( भांग ) असें शकेल. प्रजापति हा गोल यम लोकाचा असून त्यावर प्रत्यक्ष पितरांचे ( मानवाचे-प्राण्यांचे ) लिंग देहानें वास्तव्य असूं शकेल तर वरुण हा गोल मोक्षपदाचा अथवा इन्द्रलोकीचा असूं शकेल व त्याचा संबंध या जड सृष्टीशीं फार थोड्यांच प्रमाणांत येऊं शकेल. वरीलप्रमाणें या दोन ग्रहांची जी तुलना केली आहे ती एवढ्याच उद्देशानें की प्रजापतिप्रमाणें वरुणाला पापग्रह जरी तरी समजण्यात येऊं नये, निदान लेखकाची या बाबतींत जी चिकित्सक विचारसरणि आहे ती स्पष्टपणें ज्योतिर्विदांपुढें मांडल्यावांचून लेखकाची जबाबदारी पूर्ण होत नाहीं म्हणून ही तुलना केली आहे या दोन ग्रहांमधील भेदाच्या स्वरूपाची वरील प्रमाणें जी रूपरेखा आखली आहे ती सर्वस्वी खरी आहे असा लेखकाचा हट्ट नाहीं एवढेंच नव्हे तर कालांतरानें अनेक अनुभवाच्या साह्यानें या दोन ग्रहांचे सूक्ष्म प्रकृतिधर्म समजून आल्यावर वरील तुलनेंत फरकहि पडणें शक्य आहे आणि तसा फरक पडला तरी तोहि लेखकाला सत्यसंशोधनन्यायानें केव्हांही मान्यच होईल या दोन ग्रहांच्या फलामध्यें विविक्षितप्रकारचे भेद आहेत व ते पण जागजागी आम्ही प्रगट करीत आहोंत.

प्रजापतिप्रमाणें या ग्रहाच्या अंगीं अगदीं स्वतंत्र फलें निर्माण करण्याचें सामर्थ्य फारच थोडें आहे. मूळच्या गुणांचा पूर्ण विकास करावयाचा किंवा मूळच्या प्रकृतिमध्यें दाडगीउत्क्रांति करावयाची हाच या ग्रहाचा मुख्य धर्म असून राशि-स्थान इतर ग्रहयोगपरत्वें उत्पन्न होणाऱ्या फलामध्यें हें तत्व दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहत नाहीं या ग्रहाच्याअंगीं कांहीं विशिष्टफलें निर्माण करण्याचें सामर्थ्य थोड्या प्रमाणांत आहे परंतु तेवढ्याकरितां स्वतंत्रपणें चिकित्सा न करितां त्या त्या स्थळीं त्याचा उल्लेख करण्यात असल्यामुळें राशीपरत्वें विचार करीत आहोंत.

त्याचप्रमाणे प्रसंगानुसार स्नेह पण धरीतात, त्या प्रमाणात त्याचे वरुणाशी शत्रुत्व मात्र नसते. राहू-शनि-मगळ आणि प्रजापति ह्याच्याशी वरुणाचें मात्र पटत नाही व ते वरुणाचें शत्रू मानण्यात मोठी चूक होणार नाही चद्र व गुरु याच्याशी शुभयोग करिताना वरुण वाचे दाखवी शुभफळें देतो तितक्या दर्जाची शुभ फळें तो शेवटच्या चार ग्रहांशी शुभयोग करिताना देताना आढळत नाहीं

रवि हा स्वभावतः प्रखर व तापट प्रकृतिचा स्वयंप्रकाशीत असा आत्मकारक ग्रह आहे, त्याच्याशी वरुण जसा योग करील त्या प्रमाणें मनुष्याच्या आत्म्याची संस्कृति झालेली समजेल वेदान्त-अध्यात्म व योगी यास रवि नेपच्यूनच्या शुभयोगाची फार अवश्यकता आहे, तसा तो नसेल व उलट या दोन ग्रहामध्यें अशुभ योग असेल तर आत्मोन्नतीच्या मार्गांत तो एक मोठा अडथळा निदान या जन्मात आहे असे समजून चालावें रवि आत्म्याचें प्रत्यक्ष्यबीज तर नेपच्यून त्या बीजाचा प्रलक्ष्य विकास करणारा शक्ति असा या दोन ग्रहांत सबध आहे मनुष्याच्या आत्मसंस्कृतीचा छडा या दोन ग्रहाच्या सहायानें चांगल्या रीतीनें लावता येणें शक्य आहे. रवि प्रजापति प्रमाणेंच रवि नेपच्यून युति अथवा प्रतियुति हटयोगांत उत्तम आहे. परंतु सिंह ( कुंभ ) या राशींतच ती ज्यास्त फलद्रुप होईल इतराच्या बाबतींत हा योग इतर ग्रहांनी दूषित नसेल तर नोकरी-धदा-राजसन्मान यात उत्तम फळें देणारा होऊ शकेल ही युति अथवा प्रतियुति वाईट समजण्याचा प्रघात आहे तो लेखकाला पसंत नाही एवढी गोष्ट मात्र खरी की, हा योग जर दुसऱ्या पापग्रहांनी दूषित असेल तर फळें वाइट मिळतील रवि-नेपच्यूनचा त्रिकोणयोग वरच्या योगापेक्षा ज्यास्त महत्वाचा आहे मेषेचा रवि-सिंहेचा वरुण व धनूचा गुरु असा त्रिकोणयोग जर होईल तर त्या मनुष्याला या सृष्टीत कशाचीहि कमतरता भासणार नाहीं मात्र तो स्थान-बलि पण पाहीजे रवि-नेपच्यून मधला शुभ योग अध्यात्मविद्या देणारा आहे, स्वभाव मात्र कठोर पण उदार आणि निष्कपटी बनवतो, त्याचप्रमाणें अंगीं निस्पृहता पण असते हाच शुभ योग राजकृपेपासून अत्युत्कर्षाभिवृद्धि देणारा आहे रवि-नेपच्यूनमध्यें अशुभ योग असणें फार वाईट आहे, एकतर आत्मसंस्कृतीला विघातक आहे, पितृसुखाला तो प्रतिबंधक आहे, व नोकरीमध्यें तो अपयश देणारा आहे, त्याचप्रमाणें राजापासून तो उपद्रवहि देऊ शकतो.

चद्र हा ग्रह मनाचा कारक असून जल तत्व प्रधान असल्यामुळे वरुणाशीं समानधर्मीय म्हणून त्याची मैत्री फार आहे चद्रनेपच्यूनयुति चांगली फळें

उत्पन्न करणारी आहे तशी प्रतियुति नसून ती उलट अशुभ फलेंच उत्पन्न करिते. ही युति मानसिक विचारशक्तीची स्थिरतरें करणारी आहे व ती कर्क-मीनेंत होईल तर फारच स्पष्ट फलें अनुभवास येतील. हे दोन्ही ग्रह जलतत्वाचे असून जलराशींत एकत्र जमणें फारच महत्वाचें आहे, मात्र अशा माणसांस संगति-संस्कार फारच त्रासदायकहि होतात, वरुण हा स्वभावतः अनुकरणप्रिय ग्रह आहे, चंद्र ही मनाची देवता व मन फार चंचल-विकारी असतें या मुळें या मंडळींच्या मनावर आजूबाजूच्या परिस्थितीचे फार परिणाम होतात, भावना क्षणोक्षणीं बदलतात, हा योग कविवर्गाला फारच महत्वाचा आहे त्याचप्रमाणें स्फूर्तीच्या जोरावर अंतर्गोमकार्य करणारासहि हा योग फार उपयुक्त आहे. नुसती चंद्रनेपच्यूनयुति सुद्धा स्फूर्तिदायक होते. या दोन ग्रहांमध्यें शुभयोग झाल्यास कल्पनाचातुर्य, गायनवादनात जलप्रवासाची आवड, जलप्रवास व जलविहारादिविषयी प्रियता, आणि पुढील परिस्थितीची रूपरेखा ओळखणारी सूचक-स्वप्नें ही फलें दृष्टोत्पत्तीस येतील. चंद्रवरुणामधील शुभयोग कवि-नट आणि कादंबरीकारास फारच पोषक होईल यांत संशय नाहीं. या दोन ग्रहांमध्यें अशुभ-योग झाल्यास नैराश्यवाद, नैतिक गात्रांचें शैथिल्य, मनाची अस्थिरता, मादक पदार्थाविषयींचीं व्यसनें, क्षणोक्षणी बदलणाऱ्या लहरी, मातृसुखाची कमतरता अशी फलें उत्पन्न होतात. नेपच्यूनचंद्रयुति स्वप्नें फार देते व हे योग १।३।५ या स्थानांत झाल्यास स्वप्नसृष्टींत मनुष्य वावरतांना दृष्टीस पडतो, निद्रारोग व स्वप्नांत एकादी क्रीया करीत राहणें अशीं फलें सुद्धा उत्पन्न होतात. अशा मंडळींचें स्वप्नसृष्टींतील वाङ्मय व विचार फारच असामान्य व चमत्कारिक असे उत्पन्न होऊं शकतील मेस्मेरीझम अथवा हिप्नाटीझम करणारे व ज्याच्यावर हे प्रयोग करावयाचे अशा लोकांस वरील योग महत्वाचे आहेत.

नेपच्यूनचें मंगळाशीं विशेष जमत नाहीं व या दोन ग्रहांतील अशुभ-योग अतिवाईट फलें देतांना दृष्टीस पडतात. मंगळनेपच्यूनयुति व प्रतियुति शुभपरीणामापेक्षा अशुभफलांचें सहाय्य ज्यास्त देते. मादक व रसायनिक द्रव्यापासून त्रास व अपघात, अनियमितपणा, जखम होणें, कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक होणें असे परीणाम घडतात. अशीं माणसें खुनशी, लंपट, चिडखोर व हट्टी असतात. जलराशींतील युति व प्रतियुति विजेपासून अपघात दर्शवितें. या दोन ग्रहांतील त्रिकोणयोग फारच शुभफलें देणारा आहे व हा योग ज्यांच्या कुंडलीत आढळतो ती मंडळी स्वस्थ बसून राहावयाची नाहींत. अंगीं फार दांडगी जीवनशक्ति व तडफ असते व प्रागतिक तत्वाला धरून हमेश पुढें

पाऊल टाकण्यात ते पटाईत असतात. वृश्चिक राशीतील मंगळ-नेपच्यूनयुति फार अनीष्टफले उत्पन्न करणारी आहे व ती १।३।७।८।९।१२ स्थानात होणें ज्यास्तच वाईट आहे. वीज व विद्युच्छक्ति यांच्याशीं या दोन ग्रहांचा मुख्यतः संबंध असावा असें लेखकास वाटतें, व अशावेळीं हे ग्रह जल आणि अग्निराशींत असून संबंधित पाहिजेत

बुध या ग्रहाला नेपच्यूनची संगत स्नेहभावपूर्ण वाटते नेपच्यून बुध यांचा शुभयोग मानसिक व बौद्धिक सामर्थ्य वाढविणारा असून कवित्वशक्ति, चतुर य प्रीयता, विचाराध्ययन आणि वाचनाभिरुचि व लेखन व्यवसाय देणारा आहे. या दोन ग्रहांमध्यें अशुभयोग असल्यास अस्थिरपणा, मज्जातंतूचे विकार मानसिक दौर्बल्य, रोगी व कृत्रिमपणाचा तो द्योतक आहे. नेपच्यूनबुधयुति व प्रतियुति शुभफल देणारा आहे परंतु राशिवलि पाहिजे, व हेच योग जनसमाज रुढीच्या विरुद्ध वर्तन ठेवण्यासहि लाविताात नेपच्यूनबुधयुति मिथुनेंत व ३।५।९ या स्थानी झाल्यास अशी माणसें लेखनव्यवसाय आणि बुद्धिसामर्थ्य यांच्या सहायानें हटकून पुढें येतात. कर्केंतील द्वितीयस्थ नेपच्यूनबुधयुति वाचाळपणा फार देते, अशी माणसें फारच बोलकीं आढळून येतील, त्या प्रमाणात कृति मात्र दिसून यावयाची नाहीं हर्शल-नेपच्यून आणि बुध यांमधील शुभयोग छापखानेवाल्यास उत्तम व पोषक होतात. चहाल व तीन नक्षत्रातील बुध-नेपच्यून मधील अशुभ योग मेंदुचा क्षोभहि करितात, डोकें फिरतें, भ्रम होतो

नेपच्यून आणि गुरु यामध्यें स्वभवत सख्य धरून चालण्यास हरकत नाहीं. विशेषत गुरु-नेपच्यूनयुति हा योग अत्यंत महत्वाचा असून स्थानपरत्वें तो आयुष्यांत स्पष्ट फलें देणारा आहे व गोचर गुरु पुन्हा जेव्हां १२ वर्षांनंतर जन्मस्थ नेपच्यूनशी पुन्हा युति करीत जातो तेंव्हा सव्हा हीं फलें अवश्य नजरेत आल्याशिवाय राहत नाहीं. ही युति मीनेंत आल्यास " आधिक्यस्य अधिकं फलम् " असें समजण्यास हरकत नाहीं, त्याच प्रमाणे ती ३।५।९। ११ या स्थानात होणें ज्यास्त चांगलें युतिप्रमाणें प्रतियुतीची फलें तितकी तीव्र नसतात व राशिपरत्वें अशुभ फलें पण देतात. दुसरा या दोन ग्रहांतील चांगला योग म्हटला म्हणजे ३।९ हा होय हा योग विशेषतः भाग्य कीर्ति आणि आत्मसंस्कृति याबाबतींत फारच श्रेष्ठ आहे कर्केंतील गुरुनेपच्यूनयुति ५।९ या स्थानांत झाल्यास असा मनुष्य दैवीसामर्थ्याचा अथवा असामान्य मानसिक शक्तीचा पदावयास मिळेल नेपच्यून व गुरु यामधील चतुर्भयोग सांपत्तिक

अर्हचणी, धर्मप्रवृत्तीचा ऱ्हास अपयश देणारा आहे. या दोन ग्रहांतील शुभ-योगांच्या फलांत जितकी तीव्रता असते तितकी तीव्रता अशुभ योगांच्या फलांत दिसून येत नाही.

शुक्र व नेपच्यून या दोन ग्रहांत मैत्रीहि नाहीं व शत्रुत्वही पण नसून नेपच्यूनशीं शुक्र समभावानें वागतो. शुभयोग या दोन ग्रहांत असल्यास फळें फारच तीव्र असतात. अशुभ योग झाल्यासहि अशुभ फळें इतकी तीव्र नसतात शुक्र नेपच्यूनची युति व प्रतियुति शुभफलापेक्षां अशुभ फळेंच जास्त देणारी आहे व ही अग्निराशींत किंवा तीव्र नक्षत्रात ज्यास्त तीव्रता वाढवील तूळ राशींतील युति अशुभ फलापेक्षां शुभफळें ज्यास्त देईल असें वाटतें. या दोन ग्रहांत अशुभ योग असल्यास विषयवासना व त्यापासुन होणारे अनाचार, मद्यपदार्थ व शिमळबाजी एवढेंच नव्हे तर सर्व बाज्यांत प्रवीणता, पत्नीसुखाची कमतरता शृंगार व ललिता भिरुनिपासून नुकसान, पैशाचिकसाधनें व त्यापासून उत्पन्न होणारे, दुष्परिणाम अशी फळें उत्पन्न करीतात नेपच्यूनशुक्र यांमधील शुभ-योग चित्रकार, कादंबरीकार, गवई, व वाद्य प्रवीण लोक आणि नट यास फारच पोषक होणारा आहे. या शुभयोगात सृष्टिसौंदर्याचें मार्मिक परीक्षण हा गुण साठविलेला आहे. त्याचप्रमाणें टापटीप, स्वच्छता, नीटनेटकेपणा, सौंदर्या-विषयी उच्च कल्पना, शृंगारप्रीयता, नकसकामें इत्यादि गुण या योगात आहेत अशाच्या कुंडल्यात सप्तमेशाहि शुभसंबधित असेल तर पत्नीपण चांगल्या गुणाची पहावयास मिळेल.

नेपच्युनशी शनीचें कधींच पटत नाहीं उलट या दोन ग्रहांत हाडवैर धरून चालणें बरें. एकाच्या भावना अत्यंत उत्तुंग तर दुसऱ्याच्या नीच, एकाच्या हृदयात प्रेमाची ज्योत पेटलेली तर दुसऱ्याच्या हृदयांत क्रुरता अशी ही जोडी आहे. या दोन ग्रहातील शुभयोगापेक्षा अशुभ योग फलांची तीव्रता अत्यंत वाढवितात, व पुन्हा ते तीव्र नक्षत्रात असल्यास मनुष्याचें जीवित म्हणजे संक-टांचा आखाडाच बनतो. या दोन ग्रहामधील युति अथवा प्रतियुति अनिष्ट फळें देणारी आहे. या दोन ग्रहांत शुभयोग असल्यास कठोरपणा, चिकाटी, धीमे-पणानें काम पार पाडण्याचा स्वभाव, आपलेंच खरें करून दाखविण्याची हौस, मनाचा लय व एकतंद्रीपणा हीं फळें उत्पन्न होतात. अशुभ योग झाल्यास अविश्वासानें होणारे जब्बर नुकसान, कैद अथवा तुरुंगवास, गुलामगिरी व तीचे कडु अनुभव, अपयश व अपमान, जें करावें त्यांत ठोकर बसणें, दैवाचा

रसवा असे परिणाम उत्पन्न होतात. दीर्घकाल होणारा रोगहि जडतो. कर्क-मकर राशींतील नेपच्यून शनीचा प्रतियोग सर्व आयुष्य क्रांतितत्त्वाला धरूनच न्यावयास लागतो.

राहूची फलें शनिप्रमाणेंच समजावीत. अशुभ योग फार तीव्र असल्यास व ते ६।८।१२ स्थानातून होत असल्यास मृत्यू वाईट तऱ्हेनें येणें, विश्वासघातानें मृत्यू होणें, सर्प वगैरे प्राण्याच्या दंशाला उपद्रव होणें असे परीणाम हि दृष्टोत्पत्तीस येतील. राहू-नेपच्यून व हर्षल नेपच्यून किंवा शनि-नेपच्यून यांमधील शुभयोग मानिक व मारली यांस फार पोषक होतील.

हर्षल व नेपच्यून याच्या गुणधर्मांची तुलनात्मक केलिसा मागे केली आहेच त्याच धोरणानें फलें पाहिली पाहिजेत. या दोन ग्रहांतील अशुभ योग अतिशय त्रासदायक होतात. अकस्मित प्रसंग येऊन आपत्तींची परंपरा वाढते, जीवित निराशजनक वाटणें, परस्पर विरोधक भावना व त्याची मनांत काहूर माजणें, चित्ताची अस्वस्थता, विश्वास घात, अपघात अशी दुष्ट फलें उत्पन्न होतात. शुभ फलें प्रगतीस फार पोषक आहेत, व ही मंडळी वाढेल त्या परिस्थितीत पुढें आल्याशिवाय राहत नाहीत. दैवि सामर्थ्य वाढविणारा हा योग समजावा. या ग्रहामधील युति व प्रतियुति अत्यंत वाईट समजून चालणें बरें. त्यांत कर्केचा नेपच्यून-मकरेचा प्रजापति ही प्रतियुति चांगली नाही. या दोन ग्रहांमधील द्विर्द्वादशयोग अशुभ असून फार वाईट आहे.



## प्रकरण ४ थें.



### स्थानपरत्वें घरुणाचें निरीक्षण.

हा ग्रह ज्या स्थानांत असतो त्या स्थानद्योतक बाबतींत स्पष्ट फलें देण्यास तो कारणीभूत असतो अशा वेळीं तो जलराशीत आणि बौद्धिक राशीत असल्यास व त्या स्थानेशाशी शुभ योग करीत असल्यास शुभ फलें उत्पन्न करील या व्यतिरिक्त तो अशुभ फलें उत्पन्न करण्यास प्रवृत्त होतो. विशेषतः स्थानेश बुध-गुरु अथवा चंद्र यांपैकी एकादा ग्रह असून पुन्हा दोघांत शुभ योग असेल तर फारच उत्तम फलें पदावयास मिळतील. स्थानाच्या दृष्ट्या १।३।५।९।११

ही स्थानें नेपच्यूनास विशेष बलवान् असतात व ४।१२।२।६।८ ही स्थानें विशेष बलवान नाहींत. दशमस्थान वरुणास इतर ग्रहांचे अथवा रवि किंवा दशमेश याचे शुभ योग असल्यास किंवा तो राशिबलि असल्यास उत्तम, नाहीं तर वाईट फळें तो देण्यास प्रवृत्त होतो.

लग्नस्थ वरुण मध्यम बांधा ( लग्नस्थ प्रजापति स्वभावतः उंच शरीरयष्टि देणारा आहे ), वर्ण गौर पण त्यात नील वर्णाची थोडीशी छाक, नेत्र मार्जारासारखे व मधील कृष्णवर्तुळ स्पष्ट दिसणारे, मुद्रेवर गूढपणाची छटा, कपडालत्ता व स्वतांच्या वस्तू विषयी विशेष काळजी आणि नीटनेटकेपणा, जलप्रवासाची आवड अशातऱ्हेचे परीणाम उत्पन्न करीतो. लग्नस्थ नेपच्यूनाची माणसें फार शीघ्र संस्कारी असतात व जलराशींत असल्यास हा गुण उत्कटत्व असतो. चंद्र, वरुणयुति पण वरील फल देणारा आहे. लग्नस्थ अथवा तृतीयस्थ वरुण झोपेंत बरळणारी व निद्रारोगी असणें शक्य आहे. हा ग्रह दैवी सामर्थ्याचा आहे व तो लग्नांत असून बुध-गुरु-रवीनें शुभ संबंधित असेल तर तो योग अध्यात्म, योग, वेदांत अथवा गूढशास्त्रें यांत प्रगति करवीतो. लग्नस्थ वरुणाची माणसें बरींच नादलुब्ध व एकतंत्रीची पण असतात मनाचा लय लवकर लागतो, हेंच फल तो चंद्रार्कयुति करून असेल तर तो देईल. लग्नस्थ वरुण लग्नेश-चंद्र अथवा रवीनें अशुभसंबंधित असल्यास मनाची अस्थिरता, चंचलता, लहर, उदासीनवृत्ति, नैराश्यवाद, बुद्धिभ्रम, छांदिष्टपणा अथवा नाद यांसी फळें उत्पन्न करील, लग्नस्थ वरुण पाप व राक्षसग्रहानें पीडीत असल्यास तो आत्मघात सुद्धा करवील, व अशावेळीं पुन्हा तो अष्टमेश किंवा व्ययेशानें अशुभ संबंधित असूं नये.

द्वितीयस्थ वरुण चांगल्यापेक्षा वाईट फळेंच अनुभवास देतो. अशा मंडळींच्या कुटुंबांतील माणसाची हानी होणें, सांपत्तिक अडचणी येणें, पैशाच्या बाबतील स्थित्यंतर किंवा घडामोड होणें अशी फळें विशेषतः महावयास मिळतील. द्वितीयस्थ नेपच्यूनबुधयोग वक्तृत्व देणारा आहे. त्याचप्रमाणें हाच वरुण द्वितीयेशानें पीडित असल्यास नेत्र-कंठ-वाणी यांत व्यंग असणें, स्त्रीचा मृत्यु अकस्मात होणें ( अशावेळीं वरुण तीव्र नक्षत्रांत असेल तर फळें ज्यास्त स्पष्ट मिळतील ), भागीदाराचें व प्रतिस्पर्धी यानें मृत्यू, कर्ज, दारिद्र्य ही फळें उत्पन्न होतात. हाच, वरुण द्वितीयेशानें अथवा गुरूनें शुभसंबंधित असल्यास धनप्राप्ती अथवा संग्रह पण करवील. द्वितीयस्थ वरुण अष्टमेशानें अशुभ दृष्ट असल्यास अल्पायुत्व देतो.

तृतीयस्थ वरुणाची फलें विशेषतः चांगलींच पहावयास मिळतील. तृतीयस्थ वरुण, जल-बौद्धिक राशींत असताना व लग्न तृतीय, पंचम, नवम किंवा लाभ, या स्थानेंशीं शुभसंबंधित असल्यास आयुष्य प्रगतिपरच होतें. तो तृतीयेशानें शुभसंबंधित असल्यास कल्पना, चातुर्य, बुद्धिमत्ता, प्रवासापासून फायदे, मानसिक विचारांची प्रगल्भता असे गुणधर्म उत्पन्न करवितो. जल राशींतील तृतीयस्थ वरुण भावना, स्फूर्ती वाढ वेण्यास कारणीभूत होतो. अशा मंडळींच्याहातून भावनेच्या किंवा स्फूर्तीच्या जोरांत ज्यास्त कार्य होतें. शिवाय या मंडळीस सूचक स्वप्नेंहि फार पडतात, या स्थानाचा संबंध मनुष्याच्या मेंदुशीं फार आहे व तृतीयस्थ वरुण तृतीयेश अथवा चंद्रानें पीडीत असणे चांगलें नाही, मेंदुला विकृति होतें, मानसुखालाहि तो विघातक होतो. तृतीयस्थ वरुण नवमेशानें शुभदृष्ट असल्यास फारच उच्च दर्जाची फलें पहावयास मिळतील, स्वताच्या कर्तबगारीच्या जोरावर असा मनुष्य पुढें आल्याशिवाय राहत नाही. तृतीयातील मकर वृश्चिकेचा वरुण अशुभ फलें देणारा आहे. बुद्धीचा दुरुपयोग करवीतो.

चतुर्थस्थ वरुण मातृसुख, मातेला आजार, पिडा व त्यामुळें होणारा खर्च, स्थावर इस्टेटची वाताहात, हृद्रोग, आयुष्यातील शेवटचे दिवस एकांतांत व चिंतेंत जाणें वगैरे बाबतींत फलें देण्यास कारणीभूत होतो. या वरुणाची प्रवृत्ति विशेषतः कटुफलांचाच अनुभव ज्यास्त देतें. चतुर्थस्थ वरुण बौद्धिक राशींत असून चंद्र अथवा चतुर्थेशानें शुभसंबंधित असल्यास फले चांगली मिळतात व फलाच्या बाबतींत जलद्रव्यापासून उत्कर्ष, मनाचा लय लागणें, माता बुद्धिवान व प्रेमळ असणें, स्वभवात स्फूर्तीचें प्रमाण ज्यास्त असणे, संस्कार व संगत यांचा परीणाम होणें अशी फलें उत्पन्न होतात चतुर्थस्थ स्थिर, राशींतील वरुण जर पापग्रहानें पिडीत असेल तर छातीमध्यें रोग उत्पन्न होतो. व कित्येक वेळा तो कायमचा पण असतो. चर राशींचा चतुर्थस्थ वरुण राहण्याच्या जागा बदलावयास वारंवार लावतो, फिटस् येणें अंतःकरण कोमल असल्यानें त्याच्यावर आजूबाजूच्या परिस्थितीचा परिणाम होणें, दैवी प्रकोप, अशी फलें पण मिळतात. परंतु अशा वेळीं तो प्रजापति, शनि अथवा राहूनें पिडीत असावा लागतो. साधारणपणें जल राशिस्थित वरुण चतुर्थांत असून तो जर चंद्र-गुरु अथवा शुक्रानें शुभ दृष्ट असेल तर तो हितावह असून शेतकी-बागाईत आणि खनीज द्रव्यांवर उपजिवीका करणारास उत्तम समजावा. चतुर्थस्थ वरुण अग्निराशींत असून चतुर्थेश-चंद्र मंगळ किंवा शनि यांनी पिडीत असेल तर मातृसुख न

मिळणें, मातेची प्रकृति व मृत्यु अगदीं वाईट तऱ्हेनें होणें किंवा स्वताला छातीचा रोग होणें संभवनीय असतें.

पंचमस्थ वरुणाची फळें विशेषतः चांगलीच दृष्टोत्पत्तीस येतात. अशांच्या कुंडलींत विद्या, संतति व उपासना या बाबतींत फार चमत्कारिक फळें पहावयास मिळतील. अशांपैकीं कोहीं मंत्रतंत्र विद्येची फार भोक्ते असतात पण प्रत्यक्ष त्यांत चांगलें यश मिळण्यास शुक्र अथवा शनीची मदत लागते. लग्नस्थ वरुण तिसऱ्या प्रतीची मानसिक प्रगति दर्शवील तर पंचमस्थ वरुण दुसऱ्या प्रतीची मानसिक-प्रगतीची अवस्था दर्शवीतो; आणि नवमस्थ वरुण तर पहिल्या प्रतीची मानसिक प्रगति करवील, मात्र तो राशिबलि पाहिजे. पंचमस्थ वरुण बहुप्रसवराशींत असल्यास फार संतति देऊन मातापितरास संततीच्या वाढत्या संख्येचा वीट सुद्धा आणवूं शकेल. त्यांतल्यात्यांत तो बहु प्रसवराशींत असून पंचमेश अथवा गुरूने युक्त किंवा शुभदृष्ट असल्यास वरील अनुभव हटकून मिळेल. पंचमस्थ जल किंवा अग्निराशींतील नेपच्यून शुक्राने संबंधित असल्यास तो व्याभिचारप्रवृत्ति आणि व्यसनें वाढविण्यास कारणीभूत होतो. याच भावावरून शर्यति-लॉटऱ्या अशा मार्गानें अकस्मात होणाऱ्या लाभाचा विचार पाश्चिमात्य करितात व तसें मान्य केल्यास पंचमस्थ वरुण जर पंचमेश-शुक्र अथवा गुरुनें शुभ दृष्ट स्थितींत असेल व गोचरीनें पुन्हां वरील ग्रह शुभयोग जेव्हां जेव्हां करत जातील तेव्हां तेव्हां त्या मार्गानें प्राप्त होण्याचा संभव आहे व त्याचवेळीं प्रयत्न केल्यास यश येईल हें उघड आहे. पंचमस्थ जलराशींतील पापग्रहांनीं दुषित वरुण हटकून व्यसनें लावील. त्याचप्रमाणें तो जठराचे रोग पण उत्पन्न करणारा असून विशेषतः जलोदराचा प्रादुर्भाव होणें संभवनीय असतें. साधारणपणें जलराशींतील पंचमषष्ठातील वरुणाच्या मंडळींनी खाण्यापिण्यांत फार दक्ष व नेमस्त राहणें बरें. नाहींतर अतिसार, अपचन, संग्रहणी अशा रोगांपासून त्रास होतो.

षष्ठस्थ वरुणाची प्रवृत्ति वाईट फळें देण्याकडेच ज्यास्त आहे व हा वरुण रवि-चंद्र यांनीं अशुभ असतां जठर, आतडीं व मूत्राशयावरील भागांत विकार उत्पन्न करवीतो. षष्ठस्थ वरुणाच्या मंडळींनीं संसर्गजन्य रोगांपासून फार लांब राहीलें पाहीजे कारण या लोकावर अशा रोगाचा परिणाम फारच लवकर होतो. हगवण; कॉलेरा, संग्रहणी, पोटशूळ वगैरे रोगांची उत्पत्ति या स्थानावरून होते. तृतीय षष्ठस्थ पापग्रह कॉलरा, पटकी अथवा रक्तवांत्या यांची

उत्पत्ति करवितात जठर व पयनेंद्रियें, वस्ती याचा विचार षष्टस्थावरून करावयास हरकत नाहीं रोगाची उत्पत्ति बहुश जठर व पचनेंद्रियांत बिघाड प्रथमत झाल्यानें होते व म्हणून षष्टस्थान हें रोगस्थान मानण्यात येतें षष्टस्थ पीडीत वरुण नोकराचाकरापासून त्रास देववीतो त्याचप्रमाणें नोकर व शत्रू याकडून फसवेगिरी होते शत्रूविषयीं कल्पनासुद्धा करिता येत नाहीं षष्टातील वरुण वृश्चिक राशींत असल्यास फळाची तीव्रता वाढवील षष्टस्थ वरुणाची मंडळी दुसऱ्याची सेवाचाकरी करण्यात हुशारहि असतात, यात शनीशी त्याचा शुभ संबंध असावा लागतो

सप्तमस्थान वरुणास इतकें चागलें नाहीं या स्थानात तो असून अग्निराशींत असेल तर फलें वाईटच मिळतात, या स्थानातील वरुणामुळें लीला व्यंगल येतें (स्त्रीयाच्या कुंडलीत पतीला) त्याचप्रमाणें हा वरुण विवाहसौख्य, संसार, भागदारी धंद आणि दावे एकंदरीबाबतीत फार प्रतिकूल फळें देणारा आहे सप्तमस्थ पापग्रहानें दुषित वरुण लग्न अथवा सप्तमेशानें अशुभ दृष्ट असल्यास पतिपत्नी या दोघातहि व्यगें दर्शवितो. जलराशींचा सप्तमस्थ वरुण स्त्री गोरी, पाण्या डोळ्याची व किंचित ठेंगणी अशी देईल व तोच शुभ मंगळानें शुभ दृष्ट असल्यास स्त्रीचा चेहेरा व कांति फार तेजस्वीपण ठेवाल, त्याच्या अंगी जीवनशक्ति चांगली असून त्यात स्फूर्ति असते या वरुणाशीं मंगळाचा संबंध असेल किंवा तो मंगळाच्या राशींत असेल तर स्त्रीचें केस पिंगट व चेहेरा ज्यास्त लालवर्णाचा असतो या स्थानातील वरुण अग्निराशींत असून तो पापग्रहांनीं पीडीत असल्यास संसाराचें मातेरें होतें आयुष्यातील मधला काल फार नाशाचा जातो, कोर्टात खटले होऊन नुकसान होत, भागीदाराकडून त्रास होतो प्रवासात अपयश आणि संकटें देतो हाच वरुण मंगळ-शनीच्या राशींत, मंगळ-शुक्रांशीं अशुभ संबंधित, सप्तमेशहि प्रजापति शनीनें बिघडलेला, चंद्राशी पापग्रहाचा अशुभ संबंध असे उत्तरोत्तर वाढते योग स्वताला किंवा स्त्रीस व्यभिचारी बनवितात व त्यात गुप्तपणा असतो सप्तमस्थ वरुण पापग्रहांनीं पीडीत असल्यास बहुभार्यायोग, विवाहित स्त्री व्यतिरिक्त परस्त्रीच्या प्रेमपाशात पडल्यानें होणारे नुकसान अशीं फलें देतो सप्तमस्थ वरुण स्त्रीमुखराशींत, स्त्रीग्रहांनीं शुभसंबंधित असल्यास स्त्रीयापासून आकस्मिक लाभहि होतात

अष्टमस्थ वरुण पापग्रहानें पीडीत अथवा अग्निराशींत किंवा अष्टमेशानें युत अथवा प्रतियुत असल्यास, मृत्यू आकस्मिक रीत्या येणें जलराशीस्थित असा

असल्यास जलप्रवास व जलापासून अपघात होणे, अग्निराशीस्थित असा असल्यास रसायन, अग्नि जाळपोळ किंवा शस्त्रघातापासून अपघात होणें किंवा विद्युच्छक्तीपासून त्रास होणें असे परिणाम उत्पन्न होणारा अष्टमस्थ अशुभदृष्ट वरुण मृत्यूसंबंधी चमत्कारिक फलें देतो. पूर्णमृत्यू झाला नसता लोकांनी मृत समजून अत्यविधीच्या तयारीस लागणें अगीत-किंवा श्वासोच्छ्वासाला प्रतिरोध होऊन गुदमरून मृत्यू सुद्धा येतो, त्याचप्रमाणें मृत्यूनंतर वारसाई हक्कद्दष्टया इस्टेटीचा पण फार भानगड उत्पन्न होणे, भागदार, पत्नीचा खर्चिकस्वभाव वगैरे फलें पण क्वचित्प्रसंगी दृष्टोत्पत्तीस येतात हाच वरुण अष्टमेश नें शुभ दृष्ट, द्वितीयेश, चतुर्थेश दशमेशानी शुभसंबंधित असल्यास भूमीगत द्रव्य, वारसाईरुपानें होणारा लाभ, राजदरबार अथवा नोकरीत उन्नति असे लाभ मिळू शकतात साधारणपणें या स्थानातील वरुणाची प्रवृत्ति अशुभफलें देण्याकडेसच जास्त आहे

नवमस्थ वरुण आत्मोन्नतीच्या बाबतीत विशिष्ट दर्जाची फलें देणारा आहे बारा स्थानामध्यें हें एकच स्थान वरुणाला फार अप्रतीम आहे व या स्थानातील वरुण पुष्कळ चांगली फलें देतो, मात्र इतर ग्रह आणि राशिबल यांच्या स्थितीवरून फलाच्या परिणामाचें प्रमाण चढतें असतें नवमस्थ वरुणाच्या मडळीस स्वप्नें फार पडतात व ता फार सूचक असतात, तो जल राशीत असल्यास स्वप्नसृष्टींतील अनुभव जास्त चमत्कारिक असतात. याशिवाय आणखी चंद्राची भर असेल तर स्वप्नसृष्टींतील चमत्कार, मानसिक उन्नति, स्फूर्ति व भावना याचीं फलें तीव्र दिसून येतील धर्माविषयीं व गूढ शास्त्राविषयीं या मडळींची मतें फार गूढ मुद्देसुद व अखेरीस खरीं ठरणारी असतात. नवमस्थ वरुण नवमेशानें अथवा शनि प्रजापतीनें पीडीत असल्यास नास्तिक्य, अश्रद्धा, सुधारकपणा, नवा पथ, ऐहिक अवनति अशी फलें पहावयास मिळतील नवमस्थ वरुणाचा चंद्र-बुधाशीं असलेला शुभ संबंध बौद्धिक सामर्थ्य-तर्कशास्त्र व अनुमान या बाबतींत फार महत्वाचा आहे या स्थानांतील वरुण पत्नी व नातेवाईक यांचे स्वभाव चमत्कारिक दर्शवितो जन्मत मनुष्यप्राणी गत जन्मातील कर्मानुसार जं शील अथवा आत्मसंस्कृति बरोबर घेऊन येतो त्याविषयीं कल्पना जन्मकुंडलिवरून करण्याचें हें स्थान व यातील वरुण यावरूनच करता येईल, व म्हणून या स्थानास भाग्यस्थान ही संज्ञा आहे नवमस्थातील बौधिक-राशीतील वरुण आत्मसंस्कृति फार दांडगी करवील, योगी विद्वान् शोधक मांत्रिक यांस असा वरुण फार महत्वाचा आहे चरराशीस्थ हा वरुण प्रवास फार

करवितो. या स्थानातील पीडीत वरुण मेंदूचे विकार उत्पन्न करवील तृतीय-नवमस्थ वरुणापासून ज्या ज्या वेळीं गोचरीचे ग्रह जातात किंवा शुभ संबंध करितात त्यावेळेस स्पष्ट फलें हटकून मिळतात. रविचंद्राचे भ्रमणसुद्धां लक्ष्यांत ठेवण्यास हरकत नाहीं. तृतीयनवमांतील तुलेचा व शुक्रशुभसंबंधित वरुण लेखित व गायनकलेत अलौकिक गुण देणारा आहे.

दशमस्थ पीडीत वरुण आळस, धंद्याची उलढाल व त्यांत अपयश, मानापमान, अपकीर्ति, नोकरींत जब्बर ठोकर व पित्याचा अकस्मात मृत्यू इतक्या गोष्टींत प्रमुखपणें फलें देणारा आहे. दशमस्थ जलराशींतील अथवा बौद्धिक राशींतील दशमेश, लाभेश, नवमेश किंवा रवि-चंद्र-बुध-गुरु यापैकी एकाद्या ग्रहानें शुभ दृष्ट असा वरुण दशमस्थानाविषयीं उन्नतिदर्शक फल दिल्या वाचून रहाणार नाहीं. दशमस्थ वरुणाच्या अंमलीच्या आयुष्यातील ३६ ते ४८ वर्षांचा काल महत्वाचा व उलाढालीचा मेलेला दृष्टोत्पत्तीस येतो. दशमस्थ अग्नि राशींतील वरुण उच्च स्थितीवरून अकस्मात नीच दशेंत पतन करवितो व त्याला धारणेहि कित्येक वेळा अगदीं चमत्कारिक व क्षुल्लकहि असते. दशमांतील रविनेपच्यूनयुति राशिबली ( सिंह अथवा वायुराशि ) असल्यास राजकारण व राजनोकरींत अप्रतीम यश देणारी आहे, प्रतियुति मात्र अशुभ आहे. दशमांतील वरुण मंगळ-शनि-राहू किंवा प्रजापतिनें जन्मतः अशुभदृष्ट किंवा पीडीत असूं नये, त्यानीं आयुष्यांतील काल संकटमय जातो व प्रत्येक चळवळींत नुकसान व त्रास होतो. दशमस्थ वरुण जात्या धडामोडी करविणारा आहे, त्याप्रमाणें तो ज्या भावेशानें व स्वभावद्योतक ग्रहानें शुभ दृष्ट असतो तद्योतक धंद्यांत अप्रतीम यश व लाभ देतो अशा वरुण शुक्रानें शुभ दृष्ट असल्यास शुक्रदर्शकचित्रकला, वाद्य-गायन, नकस व कोतरकाम वगैरे कलेंत अभिवृद्धि करवील परंतु अशाच्या खाजगी वर्तनाबद्दलहि गवगवा पण होतो. एकाद्याच्या धंद्याचा अथवा प्रत्यक्ष संपत्ति मिळविण्याचा मार्ग कोणता हें दशम स्थानगतराशि आणि ग्रहाची स्थिती यांचा विचार करितांना दशमस्थानस्थवरुण विसरता कामा नये दशमांतील अशुभ वरुण ऱ्हास व पतन केल्याशिवाय रहात नाहीं. हें स्थान आयुष्यांतील प्रत्यक्ष धडामोडींचें व स्वस्वास्तिक विषयींचें आहे.

एकादश्य पीडीत वरुण मित्र व पुत्रसुखाला विघातक, मित्रांपासून गुप्त रीत्या नुकसान, मित्राच्या बाबतींत शारिरीक व्यंग, फायदा करिता जें कृत्य करावें तें नुकसानीचें ठरणें अशी फलें दृष्टोत्पत्तीस येतात. मित्र व्यसनी निघून त्याच्या संगतीनें कुमार्ग प्रवृत्ति सुरू होते. अशा वेळीं हा वरुण शुभ,-शनि

अथवा प्रजापतीनें अशुभ संबंधित असल्यास वरील फलें जास्त स्पष्ट मिळून संततीच्या बाबतींतहि अशींच फलें दृष्टोत्पत्तीस येतात, त्याचप्रमाणें सुना व जावई यांचा पण विचार याच स्थानावरून होत असतो. वरुण ज्या ग्रहानें या स्थानांत असून शुभदृष्ट असेल त्या ग्रहाच्या प्रकृतिधर्मानुसार लाभ व यश मिळतें. चंद्रानें युक्त अथवा शुभदृष्ट वरुण तात्कालिक लाभ. पार देतो त्याचप्रमाणें टेलीपथी, हिप्नाटीझम वगैरे अशास गूढविषयापासूनहि लाभ तो देईल. हें स्थान पंचमाच्या समोरचें, नवमाचें तृतीय, दशमाचें द्वितीय तृतीयाचें नवमस्थान आहे व त्या दृष्टीनें त्याचा विचार केला पाहिजे प्रसंग पराक्रमापासून उदमारा येणें, स्वकष्ट व नोकरीपासून संपत्ति मिळविणें व नशिबाची करामत कितपत आहे इतक्या गोष्टी या स्थानावरून पहाणें बरें; अर्थात दशमाच्या खालोखाल तिसऱ्या नंबरचें हें स्थान वरुणाच्या बाबतींत आहे. संतति आणि विद्या या बाबतींत एकादशस्थ वरुणाचा परीणाम इटकून झालेला दृष्टोत्पत्तीस येतो रविवाल व पंचमेशानें शुभदृष्ट असल्यास शुभफल तो देणारा आहे. जहाल राशींतील व पापग्रहानीं एकादशस्थ वरुण पंचम स्थानाविषयीं विपरीत व वाईट फलें देणारा आहे.

द्वादशस्थ वरुण एक ठिकाणीं बसू देत नाहीं, नेहेमी फिरावयास लावतो. जलराशींत असल्यास जलप्रवासहि घडवितो पण अशावेळीं चंद्र व पापग्रहांनीं तो दुषित असल्यास त्या प्रवासापासून नुकसान व संकटें देतो. मीनेचा वरुण गुरुनें शुभदृष्ट अथवा युक्त असेल तर जलप्रवासापासून फार उन्नति तो करविल व गोचर गुरु तर ज्यास्तच महत्वाचा समजला पाहिजे, अशा स्थितींत देशांतरानें भाग्योदय होऊं शकतो. द्वादशस्थ वरुण जर अग्निराशींत असेल किंवा पापग्रहानीं फार पीडीत असेल तर गुप्त शत्रुत्व, कैद, दंड, वगैरे वाईट फलें उत्पन्न होतात प्रवासात दुरापत किंवा त्रास होतो. द्वादशस्थ वरुण प्रजापतीनें पीडीला जाऊं नये, आपेष्टा-हाल व दुःखें यांची परंपरा वाढते व आयुष्याचा शेवट फारच वाईट प्रकारें निराशेंत होतो. या स्थानातील वरुण जनसमाजापासून मतभेद करवीतो. हाच वरुण दशमेश-नवमेश अथवा लाभेश यानीं शुभ संबंधित अथवा शनीनें शुभ दृष्ट असल्यास पोलीस व गुप्त पोलीस खात्यातून उन्नति करवीतो, किंवा हॉस्पीटलें, वेड्यांची इस्पितळें, तुरुंग, अशा खात्याच्या नोकरीत यश देतो; पण इस्पितळांच्या बाबतींत त्याला मंगळाची जोड पाहीजे. द्वादशस्थ जल राशींतील चंद्रानें शुभदृष्ट वरुण नौकाखात्यातून उत्कर्ष करवील. वायुराशी स्थित असून शनि

किंवा प्रजापतीनें शुभदृष्ट असल्यास वैमानिककलेंत तो उत्कर्ष करविणारा आहे. दशमाचें हें पराक्रमस्थान आहे व त्याहि दृष्ट्या द्वादशस्थ वरुणाचा विचार करणें अत्यावश्यक आहे. द्वादशस्थ वरुणाची मंडळी एकांतवास पत्करणारी पण असतात, हें स्थान अष्टमस्थानच्या त्रिकोणापैकी एक असून ४।८।१२ स्थानातील ग्रह मनुष्याचा अंतकाल व शेवटचे दिवस यावर हटकून परीणाम केल्याशिवाय राहत नाहींत. त्याचप्रमाणें व्ययस्थानांतील ग्रहस्थिती मनुष्याच्या शारिरीक व मानासिक शक्तींचा व्यय करणारी असून या जन्मातील व्यय पुढल्या जन्माच्या कर्मांची सामुग्री एकत्र करणारा असतो हेंहि लक्ष्यांत ठेवलें पाहीजे.



# भाग ३ रा.



## प्रकरण १ लें.



### स्फुट माहिती व विचार.



राशीपेक्षां नक्षत्रें हा भाग फलिताच्या बाबतींत ज्यास्त सूक्ष्मतेचा आहे आणि वैदिक आर्यज्योतिषांत फलजातकाचा विचार फक्त नक्षत्रपरत्वें पहाण्याचा प्रघात होता व मुहूर्तफलिताचा उगम जसा नक्षत्रांवरून झाला आहे त्याचप्रमाणें त्यावेळीं संस्कार होमहवनक्रीया करण्याची पद्धतही नाक्षत्रिकगोचरीनेंच सुरू होती राशी आमच्या नसून आम्हीं त्या यावनीज्योतिषशास्त्राहून घेतल्या असोत किंवा त्या अन्यमार्गें आमच्या ज्योतिषांत आल्या असोत. राशिपेक्षा नक्षत्रें हा भाग जास्त सूक्ष्मतेचा व स्पष्टतेचा आहे. *

नक्षत्र पटातील भरणी, चित्रा, विशाखा, कृत्तिका, जेष्ठा, मूळ, धनिष्ठा, आश्लेषा, मघा, आर्द्रा अशीं दहा नक्षत्रें तामस प्रकृतीचीं मानण्याचा प्रघात आहे

---

* हल्लीं १५।४० वर्षे सायन-निरयन वाद फार जोरानें चालू आहे त्या वादाचा फलनिर्णयाच्या कामीं होणारा निकाल नक्षत्र परत्वें निरीक्षणच लवकर लावूं शकेल सायन-निरयन वादाच्या बाबतींत नक्षत्र दृष्ट्या दोड पासून पावणे-दोन नक्षत्राचा फरक आहे व हा फरक १२ अंशाचा नसून १८ पासून २३ अंशाचा आहे व तो फलजातकाला सहन होणें शक्य नाहीं. तेव्हां या वादाचा निकाल कसोशीनें व स्वानुभवानें अगदीं बिनतोड करावयाचा असल्यास नक्षत्रात्मक ग्रहजातक पाहून संशोधन विद्वानांनीं करणें अत्यावश्यक आहे आणि भारत-फलसंशोधन कमेटीनें खास ही दृष्टि ठेवण्याविषयीं लेखकाची नम्र सूचना आहे.

आमच्यामतें अश्विनी, कृत्तिका, विशाखा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठा, आश्लेशा आणि मघा व थोडे बहुत आर्द्रा अशी नउ नक्षत्र तामस प्रकृतीची मानण्यास हरकत नाहीं. यापैकी विशाखा, ज्येष्ठा, मूळ धनिष्ठा, मघा विशाखा, कृत्तिका, आश्लेषा अशा उतरत्या पायरीनें हीं नक्षत्रें कमी तीव्रतेचीं आहेत. त्यातल्यात्यांत पहिलीं चार नक्षत्रें पूर्ण जहाल व क्रूर आहेत. स्वभावत जे क्रूर ग्रह आहेत ते या नक्षत्रांत जन्मत असल्यास त्यांच्या मूळच्या क्रूरपणात ज्यास्तच भर पडणार ही गोष्ट निर्विवाद आहे. वरील दृष्टीनें विचार करतां प्रजापति उर्फ हर्शल हा ग्रह जात्या क्रूर व तामसी स्वभावाचा आहे अर्थात् या नक्षत्रांत तो असल्यास त्याचा मूळचा गुण द्विगुणीत होणार हें उघड आहे. वरुण उर्फ नेपच्यून हा ग्रह क्रूर नसून गूढ असा दैवी ग्रह आहे व त्याचें फळ वरील तीन नक्षत्रात तो असताना ज्यास्त तीव्रतेनें अनुभवास येईल. या दोन ग्रहांची स्वाभाविक फलें व स्वभाव-धर्म सुरवातीलाच आम्ही पूर्णपणें वर्णन केले आहेत

ज्या स्थानांत अशा क्रूर नक्षत्रात प्रजापति असेल त्या स्थानाला तो मारकच होतो, व फलाची तीव्रता पण दांडगी असते. वरुणाचा गुणधर्म तितका मारक नसून आपल्या स्वाभाविक फलांस तो तीव्रता फक्त उत्पन्न कर-णारा आहे. कांहीं स्थानें अशी असतात कीं त्या स्थानांतील क्रूर नक्षत्रांतील प्रजापति आयुष्यकार्याला पोषकहि होतो. कारण अशी माणसें अनेक उलाढाल्या करून पुढें आल्याशिवाय रहात नाहीत हीं स्थाने म्हटली म्हणजे १-६-१२ हीं होत, मात्र कांहीं बाबतीत असा प्रजापति नुकसानहि देणारा आहे. अशाप्रसंगी त्या त्या स्थानेशानें तो जर शुभसंबोधित असेल तर फलें चांगलीं मिळतील वरुण क्रूरतेपेक्षां दैवी फलें ज्यास्त उत्पन्न करणारा आहे क्रूर नक्षत्रांतील प्रजा-पति व वरुण मनुष्याला स्वस्थ कधींहि बसू देत नाहींत स्वभाव फार चळवळ्या असावयाचा व कामाची विलक्षण तडफ, दांडगी जीवनशक्ति आणि अव्याहत-श्रम करण्याचा नवा उत्साह हीं फलें वरील नक्षत्रांतील प्रजापति व वरुण दीइय,-शिवाय राहणार नाहींत, व अशा बाबतीत योग्य स्थानें आणि ग्रहांच्या योगाची जोड मिळाल्यास वरील फलें स्पष्ट दृष्टोत्पत्तीस येतील. जन्मत अष्टमस्थानांतील क्रूर नक्षत्रांतील हर्शल-नेपच्यून चांगले नसून आयुष्याला ते विघातक आहेत, व अशा स्थितींत रविचंद्राची स्थिति समाधानकारक नसल्यास त्याचीं फलें तीव्रच असतात.

अश्लेषा हें नक्षत्र कर्केच्या शेवटच्या भागांत असून यांतील प्रजापति मंगळाइतकी दुष्ट फळें देणारा आहे वरुण मात्र कार्य करण्यास ज्यास्त उत्तेजक भरून चालण्यास हरकत नाहीं. मघा हें नक्षत्र वरुणास चांगलें नसून वाईट आहे. मघा नक्षत्रांतील हर्शेल अथवा नेपच्यून तृतीयस्थानी असणें फार उत्तम व अशावेळीं रवीचाही शुभ संबंध असल्यास हा योग पराक्रमाला फार पोषक पण भातृसुखाला विघातक आहे,

राजस प्रकारचीं नक्षत्रें प्रजापति व वरुण यास महत्वाचीं नाहींत सत्व प्रधान नक्षत्रें प्रजापतिपेक्षा वरुणास फारच उत्तम आहेत व तो अशा नक्षत्रांत असल्यास गुरुच्या खालोखाल फळें देऊं शकतो सत्वप्रधान नक्षत्रांतील प्रजापति आपली तामसवृत्ति बरीच कमी करीतो असें पण पहाण्यांत येतें स्वाति हें सात्विक नक्षत्र वरुणाला फार अप्रतीम आहे. अनुराधा हें नक्षत्र प्रजापतीला चांगलें नाहीं बाकीच्या नक्षत्रांतील या दोन ग्रहांचीं फळें विशिष्ट दर्जाचीं पहावयास क्वचित सांपडतात.

या दोन ग्रहास षड्वर्गांत धरावें किंवा नाही कारण जर ते आर्यजातकांत घ्यावयाचे तर षड्वर्गांत त्यास कां ओढूं नये असा प्रश्न सहाजिक उत्पन्न होतो, वास्तविक हे दोन ग्रह षड्वर्गांत आणावयास अजून त्यांचें राशीगत सूक्ष्म परीक्षण ज्यास्त झालें पाहिजे सध्या प्रजापतीच्या बाबतींत कुंभ स्वगृह मानून व मिथून आणि तूळ या त्याच्या मित्रराशी मानण्यापर्यंत हरकत नाहीं वरुणाच्या बाबतींत मीन हें त्याचें स्वगृह मानून कर्क ही राशि त्याला उच्च मानण्यांत गैर होणार नाहीं. हर्शेलचें उच्च वृषभ राशि काहीं मानतात परंतु खात्रीपूर्वक सांगता येणें आजच्या परिस्थितींत कठीण आहे. हर्शेलची उच्च राशी वृषभ धरिल्यास त्याची नीचराशी नियमा प्रमाणें वृश्चिक येते व वृश्चिकेंतील त्याची फळें वाईट जितकी असतात तितकींच कर्केंत असताना तो देऊं शकतो असें लेखकाला वाटते. वरुणाचें उच्च कर्क मानलें तर गुरुचा उच्च राशापण हाच येतें व वरुणाचे या नियमानें मकर नीच राशी येते व मकरेंत ते असताना त्याची वाईट फळें दृष्टोत्पत्तीस येतात त्यापेक्षा दुसऱ्या एखाद्या राशींत तो असताना ज्यास्त वाईट फळें दृष्टोत्पत्तीस येतात किंवा नाहीं हें ठरविलें पाहिजे.

नैसर्गिक मैत्रीच्या बाबतींत विचार करिता प्रजापती मित्र असा ग्रह बुध एकटाच आहे बाकीच्याशीं या स्वारीचें पटत नाहीं त्यातल्या त्यात शनि

मंगल व वरुण यांच्याशी प्रजापतीचे शत्रुत्व धरून चालण्यास हरकत नाहीं. शुक्र हा ग्रह प्रजापतींशी समतेनें राहु शकतो वरुणाचें चंद्र-गुरु यांच्याशीं बरेंच पटतें व तें त्याचे मित्र समजणें गैर दिसत नाहीं. नेपच्यूनचे मंगळ, शनि, व प्रजापतिशीं वैरच आहे शुक्र-बुध आणि रवी समतालानें वरुणाशीं वागूं शकतात.

प्रश्नजातकांतहि या ग्रहास घेणें अवश्यक आहे प्रश्नजातकात या दोन ग्रहाची विशिष्ट फलें अशा दृष्टीनें लेखकानें परीक्षण स्वतंत्रपणें फारसे केलें नाहीं तरी दीशा दाखविण्या इतकी सुचना एवढीच की जलराशींतील प्रजापति क्षुब्धता वाढविणारा तर वरुण उत्साहक शुभ फलें देणारा, अग्निराशींतील प्रजापति व वरुण दोन्ही क्रांति करणारे पृथ्वीराशींतील हें दोन्ही ग्रह उदासीन व मुग्धता धारण करणारे, वायुराशींतील प्रजापति उत्साहक शुभ फलें देणारा व वरुण साधारणपणें उदासीन व मुग्धता स्वीकारणारा असे समजून त्या त्या स्थानातील ग्रहाच्या परिस्थित्यानुरुप विचार करावयास हरकत नाहीं. हे दोन्ही ग्रह गूढ आहेत परंतु प्रजापती तामसी आणि विश्वासघातकी व अस्थिर प्रकृतीचा व वरुण स्थिर-धीमा व शुभ प्रकृतीचा ग्रह धरून चालणें बरें हे ग्रह फार दीर्घ परिभ्रमण करणारे आहेत व प्रश्नजातकात त्या दृष्टया त्यास तितक्यापुरतें महत्व द्यावयाचे आहे

होराजातकात या दोन ग्रहांस आणाव किंवा नाहीं हा एक प्रश्न उत्पन्न होतो. आजपर्यंत सात ग्रहाचे ( वारांचे ) सात होरे असून ते अनुक्रमाने दर तासाला बदलतात नवे ग्रह जर हे यांमध्ये येऊन आगा आडवु लागले तर होराधिपति ज्यास्त होऊन होरागणना अर्थात बिघडणार व ती नव्याप्रकारें सुसंगत आणि अनुभवात्मक तत्वावर कशी बसवावयाची हा प्रश्न सोडविणें बीकट असुन तो सध्यातरी सुटणें अशक्य आहे शिवाय कित्येक वेळा अगदी चमत्कारिक आणि विलक्षण अथवा अशक्य घटनें घडणें, रोजच्या व्यवहारांत एकदम एकदि चमत्कारिक गोष्ट घडून येणें, वगैरे गोष्टीं वरोवर प्रजापतीचा संबंध असला पाहिजे असें लेखकास आढळून आलें आहे, या बाबतीत स्वतंत्र अनुभव व निरीक्षण होणें अवश्यक आहे

कालनिर्णय पद्धति पैकी दशा पद्धतींत या दोन ग्रहांस कसें आणावें, न आणावें तर या ग्रहांचा फलें स्पष्ट अनुभवास येतात. आणावें तर वर्षगणना कशी करावी असे अनेक प्रश्न उत्पन्न होतात. आजच्या बहुतेक कालनिर्णय

पद्धतींत हे दोन ग्रह विचारात घतले जातात मग दशा पद्धतींत त्यास कां घेऊं नये असें कित्येकांचें म्ह सयुक्तिक आहे पण या ग्रहास दशा पद्धतींत कसें आणवून बसवावें त्याचा निर्णय कालांतराने लागेल असा भरवसा ठेवण्यापुरताच उल्लेख येथें करावा लागतो खरोखर योग्य मार्गानें दशापद्धतींत हे दोन ग्रह येतील तर दशापद्धतींतील दुवे हातीं येणें संभवनीय आहे.



## प्रकरण २ रें.

### मेदनीय ज्योतिष दृष्ट्या प्रजापति व वरुणाचें निरीक्षण.

व्यक्ति विषयक फल जातकापेक्षा मेदनीय ज्योतिषास या दोन ग्रहांचे परिणामाच्या बाबतीत प्राबल्य फार आहे आपत्तींचे चागले परिणाम म्हटलें म्हणजे नवें शास्त्रीय शोध, गुप्त संस्था, ज्योतिष वगैरे गूढ विद्यांची अभिवृद्धि, वायु व बाष्पप्रधान यंत्रें, वैमानिककला हे होत. वाईट परीणाम म्हटले म्हणजे सांथीचे रोग, दगेधोपे, मारामाऱ्या, अवर्षणापासून उत्पन्न होणारे दुष्काळ, तुफान, वादळें, अत्याचार, वेड्याची इस्पितळें, मार्गेफिरु लोक, नास्तिकपणा वगैरे होत

नेपच्यून उर्फ वरुणा अंगी दैवी-सामर्थ्य, दाडगी जीवनशक्ति, साक्षात्कार, गूढ वेदांत, विद्युच्छक्ति प्रधान यंत्रें, नौकाशास्त्र, चिरस्थाई संस्था वगैरे सुपरीणाम उत्पन्न करण्याचे सामर्थ्य आहे. त्याच्या दुष्परीणामाच्या यादीत अतिवृष्टिमुळें झालेला थोरा दुष्काळ, पूर, पुर्वेतयारीनें व संघशक्तीनें केलेले अत्याचार व विद्युच्छक्तिपासून अपाय वगैरे परीणाम येतात. वर वर पहाणारास दोन ग्रहाच्या फलांमध्यें विशेष फरक दिसणार नाहीं, परतु फलाच्या बुडाला बराच फरक आहे व मेदनीय ज्योतिषदृष्ट्या त्याचा विचार करिताना कांहीं ठिकाणीं लेखकास पुनरोच्चार करावा लागणार आहे.

दोन्ही ग्रह उत्पन्न करू शकतात, परतु प्रजापति उर्फ हर्शेल वायु तत्वाचा शुष्क ग्रह आहे. तो पाण्यापेक्षा एक चतुर्थांश विरल द्रव्ययुक्त असल्यामुळें हा गोल पाण्यावर तरंगत जाईल हर्शेलमुळें जे दुष्काळ पडावयाचे ते अवर्षण, पाण्याची टंचाई, पर्जन्याचा अभाव त्यामुळें पडतील. वरुण उर्फ नेपच्यून हा

ग्रह जलतत्वाचा आहे. व तो बिघडल्यास अतिवृष्टि, अकाली वरात पर्जन्य पडून पीकाची नासाडी करणें, जलस्थानें वाहून जाणें, पूर येणें अशा रीतीनें ओले दुष्काळ उत्पन्न करवील.

प्रशस्य महासागरावर नेपच्यूनचा अंमल आहे. परंतु त्यावर फिरणाऱ्या बाष्प नौकावर आणि वायूवर प्रजापतीचा अंमल आहे. वायु व जल यामध्यें सलोखा अनियमित असतो. एकाचा जोर वाढला की दुसऱ्यात खळबळ उडते. हर्शल-नेपच्यून परस्पर पीडीत झालें तर वारा सोसाट्याचा वाहून तुफान उत्पन्न होते, व जलात अपघात होतात.

साथीच्या रोगाच्या बाबतीत कॉलेरा, अतिसार व पटकी असे रोग वरुणाच्या भागास येऊं शकतात तर प्लेग, इन्फ्लुअंझा व दाहजन्य विकार प्रजापतिकडे येऊं शकतात.जो बलवान् अथवा क्रूरजास्त त्याच्या गुणधर्मप्रमाणें रोगाच्या साथी उत्पन्न होतात, व ज्याचा फक्त अशुभ संबंध असतो तो वरील साथीला ज्यास्त प्रोत्साहन देऊन तीव्रता वाढवीतो. नेपच्यूनकडे बऱ्याच काल टिकणाऱ्या रोगापैकी क्षय, शर्दन्याधि, जलोदर असे रोग येऊं शकतात. तर प्रजापतीकडे अर्धांगवायु, दमा अथवा श्वास, वायुचे झटके, फेफरे असे रोग येतात प्रजापतीचा अंमल मेंदु व फुप्फुसें यावर चालतो तर वरुणाचा अमल प्राणशक्ति ( चैतन्य ) आणि रुधिराभिसरण व जठर यावर आहे.

हर्शल हा ग्रह स्वतंत्रताप्रिय आणि अगदी लहरी ग्रह आहे याच्याशी दुसऱ्याचें पटत नाही. दुसऱ्यावर सत्ता अरेरावीपणानें चालविणें किंवा तशी परिस्थिती नसल्यास गुलाम बनून विश्वासघातकी वर्तन ठेवणें असा त्याच्या अंगी गुण आहे. मिळून मिसळून संघशक्तीनें कार्य करण्याचें शील या ग्रहात नाही. यामुळें माथेफिरुपणा, अत्याचार, अरेरावी, खुनशीपणा वगैरे प्रकारच्या गोष्टी प्रजापति एकट्याच्याच अविचारी लहरीच्या जबाबदारीवर करण्यास प्रवृत्त होतो. वरुणाचें कार्य सामुदायिक, पूर्व तयारीनें व धीमेपणाचें असतें व त्यांत केवळ स्वतांची लहर नसते. एकदें कार्य करण्यास प्रजापतीची जरूर लागते. संघ शक्तीनें कार्य करण्यास वरुणाचें पाठबळ असणें अवश्यक आहे.

प्रजापतीच्या अंमलाखाली स्थापन झालेल्या संस्था अगदी अस्थिर व लवकरच विलयास पावतात, व त्या स्वार्थपरायणतेवर आणि अविश्वासूपणावर उभ्या असतात. वरुणाच्या अंमलाखालच्या संस्था चिरकाल टिकणें शक्य आहे.

व त्यांच्या द्वारीं सामुदायिक हितहि असूं शकतें. प्रजापति क्रूर, कपटी, अत्याचारी, स्वार्थी, आकुंचितमतवादि, कल्पनाचतुर, पण विश्वास घातकी असेल तर वरुण उदार प्रकृतीचा, निष्कपटी, सामर्थ्यवान, गंभीर, विचार करणारा व सामुदायिक हितप्रिय असा आहे.

हर्शल पुरुषास जितका हितप्रद दिसून येतो तितका स्त्रियांस नुकसान कारक होतो. वरणाचे प्रमाण या बाबतींत उलट आहे. प्रजापति कठोर प्रकृतीचा व विकारवश असून प्रणयीं जनास तापदायक होतो, त्याच्यामुळें अत्याचार व खूनहि बलात्कारानें होतात. वरुणाचें कार्य संथ, स्वखुषीचें व उदार प्रकृतीचें असें होईल असें वाटतें. हर्शल प्रणयी जनाचा अंत, कठोरपणा, वैताग नैष्ठुर्य व अविचार यात करवीतो, वरुण त्याचा अंत, शांत–उदार विचार, पण अंतरयामी वसत असलेल्या निराशेंत समजूतदारीनें करवील.

राष्ट्रांचे इतिहास बदलविण्यास, त्याचा उत्कर्षापकर्ष करण्यास अनेक मोठीं स्थित्यंतरें व क्रांत्या घडवून आणण्यास या दोन ग्रहाचीं गोचरभ्रमणें फारच महत्वाचा आहेत. राष्ट्राचे आयुष्य मानवाच्या पीढींच्या मापानेंच मोजावें लगतें व तदनुसार या दोन ग्रहाचीं भ्रमणें दोषक-द्योतक असल्यामुळें त्याचें सामर्थ्यहि दांडगें असतें व या दोन ग्रहाचे इतर ग्रहाशीं होणारे शुभाशुभ-योग मेदनीय जातकांत महत्वाचे आहेत. मेदनीय ज्योतिषात प्रत्येक ग्रहाचा अंमल खालील प्रमाणें असतो व त्या ग्रहाशीं जसा या दोन ग्रहाचा योग होत जातो त्या धर्माचीं फलें उत्पन्न होतात.

रवि.–राजघराणें, राजकीय सत्ता व संस्था, राजकीय मोठा अधिकारी वर्ग.

चंद्रः–प्रजा, जनसमाज, स्त्रीसमाज, सामुदायिक हिताच्यासंस्था, संतति, बालवर्ग.

मंगळः–सेना व सेनाधिकारी, युद्धकला, डॉक्टर-सर्जन, आरमार व आरमारी लोक, रसायनशास्त्र, खून, अग्निशल्य, चिराफाडी हॉस्पिटलें, अपघात, वाष्पयानें.

बुध.––बौद्धिक व मानसिक, प्रगति, वाङ्मयवृद्धि व ग्रंथलेखन आणि वक्तृत्व, व्यापार, वेदांत, कठीण व गूढात्मक शास्त्रें, लेखक-प्रकाशक, परराष्ट्रीय वकील व मंत्री.

गुरु —न्यायाधीशी, वकील, पेढीवाले, सावकारी खजिने, बँका, सरकारी टांकसाळ, धर्म व धार्मिकसंस्था, विद्यालयें, जन्मनोंद व संख्या, मंत्रीमंडळ

शुक्र —कलाकौशिल्य, ललितकला, व ललितवाङ्मय, गायन-वादन नाट्यकला, विवाहोत्सव, व्यभिचार आणि कामप्रवृत्ती, शृंगार-विलास-व्यसनें, सौंदर्य, कुटिलनीति, बागबगीचें व बागाईत.

शनि —वृद्ध मनुष्यें, जमीनदार, शेतकरी, मजुरवर्ग, खाणी व खनीज, पदार्थ, कावाडकष्ट करणारा वर्ग, नीच जाति, कैदखाने-तुरुंग, फौजदारी खटले व पोलीस खातें.

वरील प्रमाणें ग्रहांचें कारकत्व आहे व प्रजापति आणि वरुण यांचे शुभाशुभ संबंध ज्या ग्रहांशी होतात त्या ग्रहाच्या कारकत्वानुसार गोष्टींत फलें दृष्टोत्पत्तीस येतात.

ग्रहाप्रमाणें देशाच्या राशि व शहराच्या राशि लक्षांत घेऊन या ग्रहांचें गोचर भ्रमण त्या त्या देशाच्या व शहाराच्या कोणत्या स्थानांमधून होत आहे व इतर ग्रहांशी त्याचा कसा संबंध आहे तें पण पहावें लागतें सर्व देशाच्या व शहराच्या राशि जातीपूर्वक अजून ठरल्या गेल्या नाहींत, कांहीं मात्र नक्की ठरल्या आहेत व त्या परिशिष्टांत दील्या आहेत.

ग्रहाचें कारकत्व ज्याप्रमाणें विचारांत घ्यावें लागतें त्याचप्रमाणें राष्ट्रीय ज्योतिषांत स्थान ( भाव ) कारकत्व पण पहावें लागतात. स्थानपरत्वें खाली-प्रमाणें कारकत्व पहाण्यांत येतें.

**प्रथम** —प्रजा व प्रजेची शारिरीक अवस्था, आरोग्य, देशांतील सामान्य लोक व त्यांचा स्वभाव वगैरे.

**द्वितीयः**—देशाची मालीक स्थिति, द्रव्यनिधी-खजिना-बँका-टांकसाळी, सावकारी पेढ्या, जमाबंदी व जमीन महेसुल खातें पैशाच्या देवघेवीचे व्यवहार, व्यापार व व्यापारविषयकधनसमृद्ध

**तृतीय** —रेल्वे-पोष्ट आणि टेलिग्राफ खातीं, मोटार-सायकल्स वगैरे यांत्रिक वाहनें, प्रचकार, छापखाना बौद्धिकप्रगति, वरुणविद्दी

**चतुर्थः**—शेतकी-बगाईत व कृषिकर्म, अग्रिकल्चर खातें, खाणी व खनिज पदार्थ, सुख-अचादि, वातावरण, सार्वजनिकइमारती, अधिकारी वर्गाशी विरोध करणारा पक्ष.

पंचमः--बालवर्ग, प्रयोत्पत्ति व जन्म नोंद, जुगार-शर्यति-लॉटऱ्या, नाट्य व शौकिनकला, विद्या व विद्यालयें, व्यभिचारप्रवृत्ति (पाश्चिमात्य मतें).

षष्ठः--रोगराई, सामान्य मजुरवर्ग व काबाडकष्ट करणारे लोक सैन्य व आरमार.

सप्तमः--युद्ध, परराष्ट्रीय संबंध, आपापसातील यादवीकलह, विवाहसमारंभ, व घटस्फोट, कामप्रवृत्ति, हायकोर्ट, दावे, वादविवाद, चर्चा.

अष्टमः--मृत्युसंख्या व मरणनोंद, खून-आत्महत्या, प्रिव्हीकौन्सिले, गुप्तहेर व सी.आय.डी खातें, भूमीगत द्रव्यकोष,

नवमः--धर्म-धार्मिक संस्था-सुधारणा, नीतिमत्ता-तत्वज्ञान, शास्त्रीय शोध, गोदीखातें, परराष्ट्रीयव्यापार.

दशमः--राजा-राजसत्ता, राजकुटुंब, सरदार व मोठे अधिकारी, प्रजासत्ताकचा प्रेसिडेंट, लोनायरस्त, हाउस ऑफ लॉर्डस्.

एकादशः-कायदेकौन्सिल व लोकनियुक्त सभासद, हाउस ऑफ कामन्स, सार्वसाधारण देशाला होणारा लाभ.

द्वादशः--तुरुंग, दवाखाने, गुन्हे व गुन्हेगार, गुप्त शत्रू अराजक संस्था, खर्च, चिरफाडी हॉस्पिटलें, वेडे, वेड्याची इस्पितळें

वर दर्शविल्याप्रमाणें प्रत्येक स्थानावरून फलें ज्या त्या देशाच्या राशिकुंडलीवरून गोचर ग्रहाच्या स्थित्यानुरूप पहाण्याचा प्रघात आहे. वरील स्थानापैकी मेदनीय ज्योतिषात केंद्र स्थानें (१-४ ७-१०) फार बलवान असतात व यातील गोचर भ्रमणें राष्ट्रात स्थित्यंतरें करवितात, राष्ट्राच्या उन्नतिदर्शक अशी स्थानें ३।५।९।११ हीं होत व या स्थानातील ग्रह गोचर भ्रमणें प्रगतीच्या दृष्टया फार महत्वाची आहेत. द्वितीय, अष्टम व एकादश हीं स्थानें राष्ट्राच्या सांपत्तिक स्थितीची उलाढाल करणारी आहेत तर ६-१२ ही स्थानें राष्ट्राची अवनतीचें प्रमाण दर्शविणारी आहेत. प्रजापति व वरुण यांची वरील स्थानातून होणारी गोचर भ्रमणें मेदनीय ज्योतिषांत फारच महत्वाचीं आहेत.

वरील दोन ग्रहाच्या भ्रमणाचा विचार करितां हे दोन ग्रह राशिबली असून ३।५।९।११ अशा स्थानातुन भ्रमण करीत असल्यास त्या राष्ट्राची उन्नति व प्रगति ते झपाट्यानें करितात व इतर ग्रहाची मदत असल्यास फलांचा तीव्रपणा अधिक वाढतो, साधारणपणें या दोन्ही ग्रहास २।६।८।१२ हीं स्थानें

# प्रकरण ३ रें.

## प्रजापति-वरूणाचा तुलनात्मक विचार.

### आणि

### डारेक्शन्स.

इतर प्रत्येक ग्रह एकाद्या गुणांत श्रेष्ठ असलेला आढळून येतो. हर्शल उर्फ प्रजापति हा ग्रह त्रिगुणात्म दिसून येतो व स्वभाव-कृति-विचारपरंपरा या तीन्ही गुणांत त्याचें प्रतिबिंब आढळून येतें. प्रजापतीच्या अंमलाखालील माणसें अगदीं स्वतंत्र विचाराचीं, बाण्याचीं, कल्पनावैचित्र्याचीं, दुसऱ्याशीं मिळून-मिसळून न वागणारी व स्वतंत्रपणें कार्य करणारी असून त्यांस कोणाचाही वरचढपणा व ताबेदारी सहन होत नाहीं. नेपच्यून उर्फ वरुणाच्या अंमलाखालचीं माणसें जनसमाजाशीं मिळून-मिसळून वागणारी व संघशक्तीनें कामकरणारी असतात; दुसऱ्याचें मार्ग व विचार तीं स्वीकारतात, अनुसरतात व दुराग्रही पण नसतात. प्रजापतीचा रवीशीं शुभसंबंध असेल तर राजकारण व पुढारीपणा आणि लोकनायकत्व देतो, सरकारदरबारातून मान्यता देववितो, ऐहिकसुखाच्या उन्नति करितां मनुष्यप्राणी झटत रहातो; रवीशीं वरुणाचा जोरदार शुभ योग असल्यास तो योगाभ्यास-आत्मचिंतन-आध्यात्मदृष्टि-आत्मोन्नतिकडे प्रवृत्ति वळवितो आणि ऐहिकसुखाला मान्यता व महत्व देत नाहीं. जगाच्या ऐहिकतत्वसंशोधनाला प्रजापति पोषक असून तो ऐहिकोत्कर्ष करवितो तर जगाच्या आध्यात्मिकोन्नतिला वरुण पोषक होत असतो. प्रजापतिचा प्रवास भूमार्गानें व रेलवे वगैरे वाहानानीं केवळ बदल व नावीन्यनिरीक्षण-भौतिक शास्त्रजन्य शोधास्तव होतात; वरुणाचा प्रवास जलमार्गाचा असून त्यानें जलाशयाजवळचीं असतात व हे प्रवास सृष्टिसौंदर्यपरीक्षण, निसर्गाच्या रमणीयक्रीडा व कृति पाहाण्या करितां किंवा एकांतवास व अध्यात्मिक अभ्यासासाठीं होतात. रोगांच्या बाबतींत प्रजापति बुद्धिभ्रंशता देतो व मेंदू आणि मज्जातंतूशीं त्याचा फार संबंध आहे तर वरुणाचा अंमल हृदय अथवा व्हाल्व्ज यावर असून रुधिराभिसरण आणि रक्तसंचय मार्गाशीं त्याचा फार संबंध आहे; प्रजापति गुप्त रोगांवर अंमल करतो परंतु त्यांत उष्ण व दाहजन्य विकार व वायुप्रकोपाचें वास्तव्य असूं शकते, कित्येकवेळां हे रोग परीक्षा करतां येत नाहींत व मनुष्य प्राणी खंगत झिजून मरतो किंवा रोगाचा जोर अकस्मात वाढून अथवा अपघाताचा आघात होऊन मरण प्राप्त

होते. नेपच्यूनचे रोग जल व सर्दी प्रधान असून दांतखीळ बसणें, आकुंचन व अवयव आंखडणें, रक्त गोठणें असे पण प्रकार घडतात तर प्रजापति वायुप्रकोपानें वरळण्यास व तूफान माजविण्यास तयार होतो प्रजापतीच्या अंगीं प्रसरणशक्ति वास करते व कोणत्याहि पदार्थाचें प्रसरण करून त्याची मर्यादा विस्तृत करीते। तर वरुणाच्या अंगीं आकुंचनशक्ति असून कोणत्याहि पदार्थाचें तो आकुंचन करीत जातो. एक केंद्रच्युतिपासून वर्तुलाकारात प्रसरण पावतो तर दुसरा वर्तुला-करून केंद्रस्थितिप्रत येऊन पोहोंचतो. प्रजापतीच्या अंगीं उत्साह दांडगा असून अगदीं अंतकाळच्या शेवटच्या क्षणापर्यंत त्याच्या उत्साहाची लाट खळखळत असते व अव्याहत श्रम करण्याची त्याला हौस असते तर वरुणाचा उत्साह भावनाप्रिय असल्यामुळें त्याच्या उत्साहाची जोराची लाट कांहीं काल उसळणारी आहे. प्रजापतीच्या अंमलाखालीं वाष्प व वायुप्रधान यंत्रें व वस्तू येतात तर नेपच्यूनची सत्ता विद्युच्छक्ति-प्रमाणें अदृश्य व अज्ञात सामर्थ्यावर असून त्याचें तत्व रेडीयम समजावयास हरकत नाहीं. विद्युच्छक्ति हर्शलच्या अंमलाखालीं आहे असें पाश्चिमात्य समजतात परंतु लेखकाला तसें निश्चित आज वाटत नाहीं तरी निश्चयात्मक अनुभवाव्यतिरिक्त याहीच निर्णय आज देता येत नाहीं, व विद्वानास त्या विषयीं ज्यास्त सूक्ष्मनिरीक्षण करण्याची आमची विनंती आहे.

हर्शल पुरुषतत्वाचा व सूर्यासारखेल सर्व गुणात श्रेष्ठ व बलवान असून त्याची शक्ति नेहेमीं धन ( Positive ) आहे तर वरुण स्त्री प्रकृतीचा व ज्यांत चंद्र-शुक्राचे गुण एकवटलेले आहेत असा ऋण ( Negative ) शक्तीचा आहे. अगदीं सूक्ष्मपणें विचार केल्यास मंगळ-बुध-शनि यांचे एकवटलेले गुणधर्म प्रजापतिमध्यें आहेत व चंद्र-गुरु-शुक्र यांचे एकवटलेले गुणधर्म वरुणामध्यें आढळून येतील. प्रजापतीला पाश्चिमात्य 'जागृति देणारा' ( Awakener ) ग्रह म्हणतात याचें कारण शास्त्रितत्वानुसार सृष्टींतील प्रत्येक आवश्यक घडा-मोड करून परिस्थिति बदलवित असतो व त्या बाबतीत दुःखाची व नाशाची भर त्याच्या संहारकशक्तिमध्यें असल्यामुळें मनुष्य प्राण्याचा, दुराभिमान-ताठा ना-हीसा करून त्याच्या अंगीं परमेश्वराविषयीं आस्तिक्य बुद्धि व पूज्यता आणवून कन्या ज्ञानाकडे तो आणवीतो. वरुणाला ' गुह्य ' ( Mystic ) हीं संज्ञा असून त्याचा अंमल अज्ञात व अदृश्यशक्तिवर असल्यामुळें चैतन्य देऊन आत्मोन्नति तो करवीत असतो. प्रजापतीचा संबंध जडजगाशीं जसा फार येतो त्याचप्रमाणें वरुणाचा संबंध आत्मिकसृष्टीशीं फार येतो. प्रजापति बौद्धिक शक्तीला पोषक

अथवा नाशक ( अशुभ व पीडीत असल्यास ) होतो तर वरुण मानसिक अथवा आत्मिकप्रगतीला पोषक अथवा नाशक होतो. प्रजापति रसायनशास्त्रज्ञ-इन्जिनिअर्स-शोधक-कल्पक वगैरे भौतिकशास्त्रज्ञास फार महत्वाचा आहे तर वरुणाचा संबंध हृदयाशी व मनाशी असल्यामुळें तो नाट्यकार-नट-कवि-वेदांती सूक्ष्म व चिकित्सक प्रचकार-अध्यात्मिक लोक यांस फार महत्वचा आहे. वरुणाची स्फूर्ती फार दैवी असून तीच्यांत ओजस्व-गांभीर्य भरलेलें असून त्यात सहृदयेतेची भासली भर पडते तर प्रजापति उग्र-गंभीर व गुढेसूद असतो. एकाचा अमल सत्तेनें व शहाणपणाच्या जोरावर चालतो तर दुसऱ्याचा अंमल गुणांनी व प्रेमळपणा आणि सहानुभूतीच्या जोरावर चालतो.

अर्थात दोन्ही ग्रहाचे कार्य फार विस्तृत व महत्वाचें आहे; व म्हणून त्यांस मनाचे धन व ऋणशक्तींचे ( Positive and negative forces ) म्हणतात प्रजापति जडजगाशी ( Materialism ) निगडीत असल्यामुळें तो राजयोग स्वीकारील तर वरुण केवळ विश्वव्यापक असल्यामुळें भक्तियोग स्वीकारील. वरुणाचा अमल कुंडलिमध्यें त्रिकोणस्थानावर फार चालतो. प्रजापतीचा अमल १-३-१०-११ या स्थानावर फार चालतो. प्रजापति एककोंडा व स्वतंत्रपणें फटकून वागणारा तर वरुण मिळून-मिसळून वागणारा व ज्याला सर्व जगाच्या हिताची काळजी आहे असा आहे. प्रजापति स्वतांचीच आत्मोन्नति करतांना जगाकडे पहात नाही व हटयोगाला चिकटून राहून तो निष्काळजी-कठोर व बेपर्वा असं वागतो तर वरुण आत्मोन्नति करीत असतांना सर्वजगाचें हित पहाणारा-प्रेमळ व विश्वबंधुत्वाची कल्पना उराशी बाळगणारा आहे व सर्व जग त्याचा संसार तो समजतो; त्याचें हृदय आर्द्र व कोमल आणि दुसऱ्याच्या सुखदु:खाविषयीं सहानुभूतिदर्शक असते. प्रजापीत हट्टी व निग्रह ग्रह असून त्याच्या डोक्यात शिरिरा बसल्यास अस्पसें कारणहि पूरें पडते तर वरुण सत्यप्रतीचा सरळ्तदार असून सहनशील आहे. स्त्री जातीचे सर्व नैसर्गिक गुण वरुणांत आहेत तर पुरुषजातीचे सर्व नैसर्गिक गुण प्रजापतिमध्यें आहेत. स्त्रीजातीला वरुण जितका पोषक त्यापेक्षां प्रजापति ज्यास्त घातक आहे व आजपर्यंत ज्याप्रमाणें विवाह जमवितांना मंगळ पहाण्याचा प्रघात रुढ आहे त्याचप्रमाणें प्रजापति पण पहाणें असत आवश्यक आहे. जठराशीतील सामस्य प्रजापतीची स्त्री वर्ज्य धरुन चालणें बरें, शिवाय सप्तमात शनि-प्रजापति प्रजापति-शुक्र, प्रजापति-मंगळ असे योगहि अगदी वाईट फलें देणारे आहेत तरी त्या बरोबर राशींचा पण विचार केल्या शिवाय फलांस प्राधान्य देत नाही हें उघड आहे.

प्रजापतीचा स्वभाव तडफो असल्यामुळे उतावीळपणानें पण कामाचा निकाल त्वरित लावण्याकडे त्याची प्रवृत्ति असू शकेल तर वरुणाचें कार्य सयपणाचें व कालाला योग सवल्त देणारें असतें. वरुणाच्या अंगीं नाद लुब्धता अत्यंत असून त्याप्रमाणे तो गायनवादनाचा जसा भोक्ता आहे त्याचप्रमाणे गुंगी आणणाऱ्या पेयाची पण त्याला आवड आहे.

वरील प्रमाणे आणखी ज्यास्त स्पष्टविचार या दोन ग्रहा विषयीं तुल्नात्मक पद्धतीनें पुढें ठेवण्यात प्रजापति व वरुणाविषयी यथायोग्य कल्पना देण्याचा उद्देश आहे, कारण दोन्हीं ग्रह गूढ असल्यामुळें गूढ व आकस्मिक परीणामाच्या बाबतात कित्येक वेळा हे ग्रह चांगल्या ज्योतिषालासुद्धा बुचकळ्यात पाडतात पाश्चिमात्यांची व काहीं अमेरिकन ज्योतीषाची मजल या दोन ग्रहाच्या जातका विषयी फार पुढे काहीं बाबतींत गेला आहे परंतु ती सर्व चिकित्सक विचारमालिका असून अनुभवाच्या कसोटीनें उतरल्यावाचून देण्यात व्यर्थ कालक्षेप व भ्रमविस्तार होतो म्हणून ज्यास्त दीली नाहीं

दुसरी एक महत्वाची सूचना करणें अगत्याच वाटतें हर्षल व नेपच्यून या दोन ग्रहाचीं वर्णन केलेलीं फल दरेक कुंडलीत कधींच सापडणार नाहीत हर्षल व नेपच्यूनच्या विशिष्ट फलाच्या कुंडल्या शेकडा ३० फार तर सापडू शकतील व बाकीच्या कुंडल्यात ते निर्जीव असल्ले आढळून येतील किंवा स्वतंत्र फलें देण्यास ते असमर्थ असतात वरील ३० कुंडल्यात २० कुंडल्या प्रजापतीच्या विशिष्ट फलाच्या तर फक्त १० कुंडल्या नेपच्यूनच्या विशिष्ट फलांच्या आढळतील त्यात पुन्हा फलाचा तीव्रपणा स्थान व राशिपरत्वेंच आढळून येई ल. अशुभ फलें शुभफलापेक्षा ज्यास्त दृष्टोत्पत्तास येतात, व तदनुसार दृष्टि ठेवून या दोन ग्रहाची फलें पहाणें श्रेयस्कर होय. दरेक कुंडलींत या दोन ग्रहाची विशिष्ट फलें पहाण्याचा मार्ग सयुक्त तर नाहींच परंतु ती विचारदृष्टी पण बदलविणं वाजवी आहे. विशेषतः हे ग्रह स्थान व राशिवलि असून इतर ग्रहाशी जोरदार योग करितात तेव्हाच त्याची स्पष्ट फलें आढळून येतात. कित्येकवेळां या ग्रहांची जन्मस्था स्थिति जोरदार नसूनही गोचरीनें अथवा डायरेक्शननें त्याची फलें फार जोरदार व तीव्र असलेली पण दिसून येतात.

## डायरक्शन संबंधीं.

डायरेक्शन दृष्टि निर्णयात्मक स्वरूप चीं विस्तृत अनुभवात्मक फलें फार उपलब्ध झालीं नाहींत. डायरेक्शननें जेव्हा हर्षल-नेपच्यूनचे शुभाशुभ योग इतर ग्रहांशीं होतात व जन्मत जे योग असतात तेंच योग डायरेक्शननें अथवा

गोचरीनें जेव्हां या ग्रहांचे होतात तो काल आयुष्यांत फार घडामोडींचा व कालितत्वाचा असतो ही गोष्ट निश्चित झाल्यासारखी आहे. डायरेक्शनमध्ये स्वतः फलें निर्माण करण्याचें सामर्थ्य या दोन ग्रहांत फारच थोडें आहे. ज्या ग्रहांशी त्यांची डायरेक्शन सुरू होतें त्या ग्रहाच्या धर्माप्रमाणें व ज्या स्थानांत होतें तत्स्थानसंबंधी फलांतच या घडामोडी होत असतात. सगळ्यांत मंगळ रवि व शनीशीं या ग्रहांच्या होणाऱ्या अशुभ डायरेक्शन संकटें, अपघात, पैशाचें नुकसान व सांपत्तिक-ऱ्हास, कारागृहवास, आरोप, कर्जदलाली हे दुष्परिणाम उत्पन्न करितात व आयुष्यांतील अडचणींशीं सारखें झगडावें लागतें. वरील ग्रहांच्या डायरेक्शन्स जेव्हां पाठोपाठ एकामागून येतात तेव्हां आयुष्य म्हणजे संकटांचा व कायित दुर्बलतेचा आखाडाच आहे असें वाटतें इतकी संकटपरंपरा वाढते. या डायरेक्शनचे परीणाम पण दीर्घकाल टीकतात. चंद्र-बुध-गुरू व शुक्र यांच्याशीं हर्षल-नेपच्यूनच्या झालेल्या अशुभ डायरेक्शन्स वरील डायरेक्शन इतक्या तीव्र नसतात; एवढेंच की सुखाची कमतरता, पैशाची टंचाई, काळजी व चिंतामग्नता वगैरे फलें मात्र उत्पन्न होतात. चंद्राशीं होणाऱ्या या दोन ग्रहांच्या डायरेक्शन्सची फलें दीर्घकाल टिकत नाहींत. शुभ डायरेक्शनच्या बाबतींत या ग्रहांच्या रवि-शनि-गुरु यांच्याशीं झालेल्या डायरेक्शन्स उन्नतिला पोषक असून उत्कर्ष फार त्वरेनें त्या करणाऱ्या आहेत तशाच त्या शास्त्रोन्नतीला पोषक होतात. वारसाहि-सट्टे-लॉटऱ्या किंवा दुसऱ्या मार्गानें एकदम धनदौलत मिळण्यास या दोन ग्रहांच्या शुभ डायरेक्शन्स फार कारणीभूत होतात; त्यातल्यात्यांत या ग्रहांची त्रिकोणाची डायरेक्शन फार उत्तम व बलवान असून ती उत्कर्ष फार त्वरेनें करितें. संघटित अथवा व्यक्तिविषयक पण मोठालीं कार्यें या डायरेक्शनखालीं फायदेशीर अशीं होतात, मान्यता वाढते. अशुभ डायरेक्शनमध्यें प्रतियुति व केंद्रयोगाच्या या दोन ग्रहांच्या इतर ग्रहांशीं होणाऱ्या डायरेक्शन्स अत्यंत पीडादायक होतात चोहोंबाजूंनी त्रास होतो व त्याचे परीणाम दीर्घकालाचे असून मनुष्याची परिस्थिति फार भयंकर व निराशाजनक होते. असल्या डायरेक्शनमध्यें कोणतेंहि कार्य नुकसानीचें माप पदरांत टाकते. कुटुंबांतील माणसें मृत्यू पावणें, नोकरी-व्यापार सुटणें, स्थान बदलणें, अघटित प्रसंगाचे अनुभव येणें, अपघात होणें असे अनेक अनुभव प्रत्ययास येतात. यापेक्षा डायरेक्शनच्या बाबतींत ज्यास्त व सूक्ष्म फलें व विवेचन आजच्या परिस्थितींत केवळ कल्पनांच्या व अनुमानाच्या भरवशांत करणें अयोग्य आहे, व तशीच जिज्ञासूंची इच्छा असल्यास ॲलन लिओ-रॅफेल-झॅड-

फॉल-सफायेल यांचे ग्रंथ इंग्रजी जाणणारांनी पहावेत; परंतु त्या ग्रंथांतहि इतर ग्रहांच्या डायरेक्शन्सचीं फळें जितकीं सूक्ष्म व अनुभवात्मक दिलीं आहेत तितकीं या दोन ग्रहांच्या डायरेक्शन्सचीं दिलेलीं नाहींत असेंच आढळून येईल. थॅलन लिओसारख्या विस्तृत व चिकित्सक लेखकांचीं फळें सुद्धां वरील प्रमाणेंच गोवलेलीं परंतु योगपरत्वें शब्दरचनाभेदानें वर्णन केलेलीं फळें आहेत. याचें कारण अजून डायरेक्शनच्या दृष्टया अनुभवजन्य सामुग्री अपुरी आहे हेच होय.



# पाश्चिमात्य ग्रहदृष्टि स्पष्टिकरण.

| ग्रहांमधील अंशात्मक अंतर. | नांव | शुभाशुभ | चिन्ह. | |
|---|---|---|---|---|
| ३०° | सेमि-सेक्स्टाइल | शुभ | ⊻ | द्विर्द्दश |
| ४५° | सेमि स्क्वेअर | अशुभ | ∠ | |
| ६०° | सेक्स्टाइल | शुभ | ✱ | ५ |
| ७२° | क्विंटाइल | मध्यम शुभ | Q | |
| ९०° | स्क्वेअर | अशुभ | □ | केंद्र |
| १२०° | ट्राइन | शुभ | △ | त्रिकोण |
| १३५° | सेस्क्विक्वेड्रेट | अशुभ | ⚼ | |
| १४४° | बायक्विन्टाइल | शुभ | ± | |
| १५०° | क्विंकन्स | अशुभ | ⚻ | षडष्टक |
| १८०° | आपोझिशन | अशुभ | ☍ | प्रतियोग |
| | पॅरलल ....... | मध्यम | P | समक्रांति |
| ०° | कंजंक्शन ....... | मध्यम | ☌ | युति |

याशिवाय हल्ली आणखी पुष्कळ दृष्टियोग निघाले आहेत पण ते फार महत्वाचे नाहीत.

---

| ग्रहांची चिन्हें | | | पृथ्वीपासून अंतर | | काल दिवस. |
|---|---|---|---|---|---|
| रवि | सन | ☉ | रवि | ९ कोटी ३० लक्ष | पृथ्वीला ३६५¼ |
| चंद्र | मून | ☾ | बुध | ३ कोटी ६० लक्ष | ....... ८८ |
| मंगळ | मार्स | ♂ | शुक्र | ६ कोटी ७० लक्ष | ....... २२५ |
| बुध | मर्क्युरी | ☿ | मंगळ | १४ कोटी १० लक्ष | ....... ६८७ |
| गुरु | ज्युपीटर | ♃ | गुरु | ४८ कोटी ३० लक्ष | ....... ४३३३ |
| शुक्र | व्हेनस | ♀ | शनि | ८८ कोटी ६० लक्ष | ....... १०७५९ |
| शनि | सॅटर्न | ♄ | प्रजापति | १७८ कोटी २० लक्ष | ....... ३०६८७ |
| प्रजापति | हर्शेल | ♅ | वरुण | २७९ कोटी ३० लक्ष | ....... ६०१२७ |
| वरुण | नेपच्यून | ♆ | चंद्र | २ लक्ष ३८ हजार | ....... २७⅓. |
| राहू | मूनस् नोड | ☊ | | | |
| केतू | मून् टेल | ☋ | | | |

**कुंडलि नं. २५**

श्री. नारायण महाराज केडगांव

जन्म तारीख २० मे १८८५

दुपारीं १ वाजून २७ मिनिटें

वृश्चिक ११ · तुला १९ · राहू १-०२ · नेपच्यून १८-५५ वक्री · कन्या १६-५९ · गुरु २७-२ · सिंह २० · चंद्र २०-२ · कर्क २० · धनु २० · मकर २० · शनि २४-२ · मिथुन २० · शुक्र २-४७ · नेपच्यून · रवि ११-१६ · वृषभ ११ · मंगळ ८-४५ · बुध ५-११ · मेष १९ · मीन ११-५२ · कुंभ २०

**कुंडलि नं. २६**

दादाभाई नौरोजी

जन्म तारीख ४ सप्टेंबर १८२५

मिथुन २१ · शनि २१-१ · चंद्र ०-१ · वृषभ २५ · मेष २७-२१ · मीन १८ · कुंभ ११ · कर्क १९ · शुक्र २१-३१ · मंगळ १२-१ · सिंह ११ · गुरु २८-२१ · रवि ११-४५ · कन्या १६ · तुल २४-२१ · बुध १-४८ · वृश्चिक २५ · धनु २१ · राहू १४-३१ · मकर १८ · हर्शल १७-७ · नेपच्यून ५-४ वक्री

**कुंडलि नं. २७**

डॉ. भा. दीक्षित.

जन्म ता. २०।२१ जुलै १८५१

पहांटे ३ वाजून ३१ मिनिटें.

सिंह १५ · शुक्र १६-२१ · बुध २४-४५ · रवि २६-० · कर्क ११ · मिथुन २३-२१ · मंगळ १८-५८ · राहू १०-११ · शनि २१-११ · वृषभ २२ · हर्शल १२-१५ · मेष १८ · कन्या १५ · तुल १२ · वृश्चिक २२ · धनु २१-२१ · गुरु १५-२२ · मकर ११ · कुंभ १५ · चंद्र २-५५ · मीन १५ · नेपच्यून १२-२४ वक्री

कुंडलि नं ३७
पुरुष
जन्म ता. १६ नव्हेंबर १८८७
रात्री १० क. ९ मि.
ट्रेन टक्करींत मोठा अपघात



कुंडलि नं ३८
पुरुष
जन्म ता. १८ आक्टोंबर १८९२
रात्री ८ क. ४९ मि.
कायमचा पांगळा झाला



कुंडलि नं. ३९
पुरुष
जन्म ता. ९ डिसेंबर १८९४
ट्रेन टक्करींत भयंकर जखमा

# हर्शल-नेपचून.

## परिशिष्ट २रें.

### जन्मकुंडल्यांची स्पष्टता.

नं० १ ची कुंडलि महाराष्ट्र-स्वराज्य स्थापन करणारे श्रीशिवछत्रपति महाराज यांची आहे.* महाराजांचें चरित्र सर्वांस माहीत आहेच. कुटील-धूर्त व कपटपटु औरंगजेबासारख्या जबरदस्त प्रतिस्पर्ध्याशीं सतत तीन तप महाराज झगडले आहेत व त्यांत त्यांचें राजकारण, कडक शिस्त, असाधारण प्रसंगावधान, दूरदर्शीपणा, युद्धकौशल्य वगैरे अनेक गुणच फार उपयोगी पडले आहेत. १६६५ चें साल महाराजांस अत्यंत वाईट व धोक्याचें गेलें आहे. २० वर्षांत मिळविलेले मुख्य मुख्य किल्ले व मुलूख मोगलांच्या स्वाधीन करून दिल्लीस जाणें व तेथें नजरकैदेतून धूर्तपणानें सुटका करून घेऊन परत येणें ( डिसेंबर १६६६ ), हा तो प्रसंग होय.

कुंडलींत हर्शल ३।११ नेपचून, हर्शल त्रिकोण बुध; हर्शलच्यासमोर मंगळ; बुध प्रतियोग नेपचून; हर्शलच्या द्वितीयांत शनि, शनीच्या द्वितीयांत नेपचून व नेपचूनच्या द्वितीयांत गुरू असे योग झाले आहेत. ( या ग्रंथांत फक्त हर्शल-नेपचूनचेच योग दिले आहेत. )

नं० २ ची कुंडलि श्रीशिवछत्रपति महाराजांच्या ज्येष्ठ चिरंजीवाची आहे. महाराजांनी सतत ४ तपांच्या श्रमानें स्वराज्यवृक्ष वाढवावा व तो धोक्याच

---

* महाराजांच्या जन्मतारखेविषयीं बराच मतभेद उत्पन्न झाला आहे. ज्योतिर्विद् जीवनराव चिटणीस-महाळकर वगैरे मंडळींनी १७ तारीख ठरविली आहे; व तीच आजपर्यंत ग्राह्य झाली होती परंतु इतिहास संशोधक प्रोफेसर जदुनाथ सरकार यांनी अनेक अस्सल पत्राधारें १० तारीख सिद्ध केली आहे व त्याच तारखेची आम्ही कुंडलि दिली आहे. दीक्षित व चाफेकर द्वयांनी जन्मकालाविषयीं नवीनच प्रश्न उभा केला असून महाराजांचा जन्म शके १५५१ ( सन १६३० ) फाल्गुन ( फेब्रुवारी ) वद्य ३ सह ४ जन्मघटि ७६ पळें ५१ हा काल ठरवून त्याप्रमाणें निरयन ३ अंश धनु लग्नाची कुंडलि पण पुढें मांडली आहे. ( विशेष माहिती भा. इ. सं. मंडळाच्या जून १९२२ च्या अंकांतील ज्योतिर्विद्यांनी पहावी ) हा काल आम्हांस ग्राह्य नाहीं.

कालात संभाजीने उलथून पाडण्याच्या स्थितिला आणावा हें महाराष्ट्राचें दुर्दैवच म्हटलें पाहिजे. संभाजीच्याअंगीं पुष्कळ चांगले गुण होते परंतु व्यसनासुळें त्या गुणाचा दुरुपयोग झाला. तो अत्यंत निधड्या छातीचा शिपाई बाण्याचा व करारी स्वभावाचा मनुष्य होता. त्याच्या हातून अत्यंत निंद्यकृत्य जें घडलें तें म्हणजे आपल्या सावत्र मातेवर भर्तृहत्येचा आरोप ठेवून तीला तारीख १९ जून १६८० रोजीं भितींत जिवंतपणें चिनणें ( राजारामाची मातोश्री सोयराबाई ) तीनें अन्नपाण्यावाचून ३ दिवसात तेथेंच प्राण सोडणें ही होय. त्याच प्रमाणें संभाजीचा शेवटहि फार वाईट तऱ्हेनें झाला आहे. औरंगजेब यानें त्याचे अत्यंत हाल करुन त्याला ठार मारलें तरी तो प्रत्येक नशीबाचा घोटळा त्यानें धैर्यानें व सहनशीलतेनें सहन केला आहे परंतु तो शरण गेला नाहीं.

याच्या कुंडलींत मातृस्थानावर राहू-हर्शल व नेपचून हे तीन पापग्रह जन्मस्थ रविच्या समोर आहेत. रवि प्रतियोग नेपचून शुक्र त्रिकोण हर्शल, भाग्येश बुधाच्या समोर हर्शल, राहू नेपच्यून युति एवढेच हर्शल नेपचूनचे योग आहेत.

नं० ३ ची कुंडलि श्रीशिवछत्रपति महाराजाचे दुसरे चिरंजीव राजाराम याची आहे. याचें आयुष्य म्हणजे महाराष्ट्र स्वराज्य स्थापना पुन्हा करण्या करिता फार दगदगीचें व त्रासाचें गेलें आहे. याचा स्वभाव शांत-विचारी होता. याच दगदगीच्या स्वारीत रक्ताच्या उलटया होऊन त्याच अजारांत तो ३९ व्या वर्षी म्हणजे तारीख २ जून १७०० वारला. याला १ बायका होत्या. १६९२ ते १६९९ पर्यंतच्या सात वर्षांत याला जींजीच्या वेढयात राहावें लागले

याच्या कुंडलीत नेपचून ३।११ मंगळ, हर्शल त्रिकोण गुरु व गुरु नेपचून केन्द्र असे तीनच योग आहेत. धनू राशीपासून बाकीच्या तूल ते वृषभेपर्यंत दरेक राशींत एकेक ग्रह एकापुढे एक आहेत.

नं० ४ ची कुंडली इंग्लंडचा राजा चार्लस १ ला याची आहे. हा लहानपणीं अत्यंत अशक्त होता. ७ व्या वर्षा पावेतो चालत नसे. पुढें मात्र सशक्त झाला. १६ व्या वर्षा प्रिन्स ऑफ वेल्स झाला. जेम्स १ त्या नतर हा तारीख २७ मार्च १६२५ ला गादीवर आला. या पुर्वीच १॥ महिना त्याचा विवाह झाला होता यानें तीनदां पार्लमेन्ट बोलावून तिनदां तें मोडलें, व

पुढें ११ वर्षे पार्लमेन्ट वांचून राज्यकारभार करूं लागला. यामुळें बंडें होऊं लागलीं. त्यांत याचा पराभव झाला. व तो ५ मे १६४६ ला पार्लमेन्टला शरण गेला. सहा सात महिने कैदेंत; जुलमी राजा म्हणून तारीख ३० जानेवारी १६४९ रोजीं जाहीरपणें त्याचा वध करण्यांत आला व हा प्रसंग त्यानें संभाजी प्रमाणे करारी बाण्यानें धैर्यानें सहन केला परंतु पार्लमेन्टच्या अटी त्यानें मान्य केल्या नाहींत.

याच्या कुंडलींत भाग्यस्थानीं हर्शल वक्रि व त्याचा लग्नस्थ वरुणाशीं त्रिकोण, चद्र २।१२ नेपच्यून; हर्शल ६।८ चंद्र;* शनि हर्शल प्रतियुति, शनि ३।११ वरुण, असे मुख्य योग झाले आहेत. १६४५ मध्यें गोचर हर्शल-वरुणाचा धनूराशींत प्रतियोग होत होता.

नं० ५ ची कुंडलि फ्रान्सचा राजा १६ लुई याची आहे. दरबारचा थाट व ऐषाराम वाढल्यामुळें रयतेवर फार कराचा बोजा पडत चालला व त्यामुळें जुलमहि वाढले. फ्रेंच प्रजेनें बंड उभें केलें, राज्यक्रांति झाली व १६ व्या लुईचा त्याची पत्नी मेरी अॅन्टानिटेसह जाहीरपणें तारीख २१ जानेवारी १७९३ रोजी वध करण्यात आला

याच्या कुंडलींत मंगळाच्या समोर हर्शल सप्तमात जलराशींत वक्रि; चंद्र नेपच्यून अंशात्मक केंद्रयोग, नेपच्यून मघा तीव्र नक्षत्रात, भाग्य द्वितीयाधिपति शुक्र ६।८ हर्शल, शनि ३।११ हर्शल, हर्शल ६।८ वरुण, चद्र हर्शल त्रिकोण, एवढेच योग आहेत.

नं० ६ वी कुंडलि नेपोलियन बोनापार्ट या प्रसिद्ध योध्याची आहे. याला युद्धशास्त्रात तोडीचा प्रतिस्पर्धी नव्हता व सर्व युरोपचें वातावरण यानें २० वर्षे क्षुब्ध करून सोडलें होतें; आलेल्या प्रत्येक संधीचा फायदा घेणें, कामाची तडफ व तीव्र स्वभाव, लोकांवर वर्चस्व सहज ठेवण्याची हातोटी वगैरे गुणांत तो प्रसिद्ध आहे. १८०५ पर्यंत याचा काल उत्कर्षाचा चढता होता. उच्च शिखराला पोहोचून पुन्हा एकदम अधःपात होणें या तत्वाचें त्याचें चरित्र आहे. याची पत्नी जोसेफाईन याच्यापेक्षां ६ वर्षांनीं मोठी

---

* या स्पष्टीकरणात सौंदर्य व स्थल संकोचासाठी योग वरील प्रमाणें दर्शविले आहेत. २।१२=द्विर्द्वादश योग, ३।११=तृतीयैकादश योग असें समजावें.

व तीला प्रथम संबंधापासून २ मुलें होतीं. नेपोलियननें तीच्याशीं १८०९ डिसेंबरला घटस्फोट केला.

याच्या कुंडलींत मंगळ नेपच्यूनयुति सप्तमस्थानाच्या (युद्धस्थानाच्या) पंचमांत व त्यांच्याशीं सप्तमस्थ हर्शलचा त्रिकोण योग झाला आहे. हर्शल सप्तमांत रोहिणी नक्षत्रांत व त्याच्या तृतीयांत शुक्र असल्यामुळें याचें वर्तन फार व्यभिचारी होतें असा मवगवा आहे.

७ वी कुंडलि बव्हेरीयाचा राजा लुई १ ला याची आहे. याला चित्रकलेचें फार वेड होतें. इमारती व चित्रें यांत अतोनात यानें खर्च केला; स्वभाव ऐषारामी पण होता. लोला मॉन्टेस नांवाच्या एका सुंदर स्त्रीनर्तकीच्या सहवासातच हा सर्व काळ रहात असे यामुळे लोकांनीं दोनदा बंड केलें तेव्हां मुलाच्या नावानें यानें स्वखुषीनें सिंहासन १८४८ मध्यें सोडून दीलें.

याच्या कुंडलींत शुक्र–राहू युति व त्यांचा वरुणाशीं त्रिकोण; रवि-बुध –हर्शल युति, हर्शल ३।११ नेपच्यून; हर्शल गुरू प्रतियुति व दोघेंहि धनि; शुक्र ३।११ हर्शल असे योग आहेत.

८ वी कुंडलि जर्मनीचे प्रिन्स बिस्मार्क यांची आहे. हे मोठे राजकारणी मुत्सद्दी असून सर्व जर्मन राष्ट्राचे प्रधान होते. " राजकारणाचे प्रश्न तलवारीच्या जोरावरच सोडविले पाहिजेत " हा गुरुमंत्र यांनीं जर्मनील शिकविला. जर्मन राष्ट्र ऑस्ट्रियाची सत्ता झुगारून स्वतंत्र जें झालें ते यांच्या कर्तबगारीनेच होय. हे जसे राजकारणी मुत्सद्दी तसे मोल्ट्के हे युद्धकलाविशारद सेनापति प्रशियाला मिळाले होते. राजकारणाच्या जोरावर बिस्मार्कनीं कुरापत काढावी व मोल्ट्के यानें शेवटास न्याव अशी ही द्वयी होती. यांचा दुसऱ्या राष्ट्रावर फार दरारा असे. इह्याच जर्मनी म्हणजे या द्वयांची कर्तबगारी होय.

याच्या कुंडलींत राजकारण ग्रह रवि उच्चीचा मानयस्थानीं व त्याच्य त्रिकोणांत हर्शल, गुरू ३।११ हर्शल असे फक्त हर्शलचे योग आह आहेत.

९ वी कुंडली आस्ट्रीयाचे बादशहा काउंट फ्रान्सीस जोसेफ यांची आहे, स युरोपियन राजापेक्षां याची कारकीर्द दीर्घ कालाची आहे व त्यांत अने क स्थित्यंतरें झालेलीं यांनीं पाहिलीं आहेत. जन्मसाल्यावर ४ तासांनीं

ग्रहण होतें. यास कुटुंबसुखाची फारच कमतरता असून त्याविषयीं तडाखेपण बसले आहेत याचा बंधू कत्तलींत मारला गेला, मुलगा शिकारीस गेला तो मेलेला सापडला पत्नीचा अनार्किस्टनें खून केला, मेव्हणी पॅरीस बजारच्या आगींत मेली, राज्याचा वारस पुतण्याचा त्याच्या पत्नीसह अनार्किस्टनें खून केला व तेंच प्रस्तुत महायुद्धाचें कारण होऊन बसलें. अशारीतीनें कुटुंबसुखाचे कटु अनुभव घेऊन १९१६ मध्यें ८६ व्या वर्षी हे वृद्ध बादशहा निवर्तले.

याच्या कुंडलीत लग्नाष्टमेश शुक्र व नेपच्यून प्रतियुति, पंचमेश शुक्र २।१२ हर्शल, बुध ६।८ हर्शल, शनि-रवि-चंद्र युति ६।८ नेपच्यून एवढेच योग आहेत.

नं० १० ची कुंडलि बडोद्याचे अधिपति श्रीमंत मल्हारराव गायकवाड यांची आहे. याचा अमल प्रजेवर फार अदाधुंदीचा व वाईट होता त्यामुळें ते नालायक ठरून १८७५ एप्रिलमध्यें मद्रासला त्यांची रवानगी झाली व तेथेंच नजर कैदेंत २५ जुलै १८८२ रोजीं त्याचें देहावसान झालें. यांनी आपल्या बुद्धीचा नेहेमीं दुरुपयोग केला आहे.

याच्या कुंडलींत नेपच्यून हर्शल तृतीयांत आहेत. चंद्र २।१२ हर्शल, राहु नेपच्यून प्रतियुति, शनि नेपच्युन मंगळ त्रिकोण, बुध ३।११ हर्शल, बुध २।१२ नेपच्यून, गुरु २।१२ हर्शल एवढेच योग झाले आहेत

नं० ११ ची कुंडलि झांशीच्या लक्ष्मीबाई राणीसाहेब यांची आहे. यांचा जन्म साधारण कारकुनी पेशाच्या घराण्यांत झाला पण विवाह श्रीमंत गंगाधरपंत ( झांशीचे अधिपति ) यांच्याशीं ८ व्या वर्षी झाला. यांचा चेहरा निमगोरा पण अत्यंत देखणा होता. स्वभाव तापट व लढवय्या-शिपाई बाण्याचा-करारी होता यांच्या अठराव्या वर्षी गंगाधरपंत वारले. पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांनी दत्तक घेतला परंतु तो ब्रिटीश सरकारनें मान्य केला नाहीं. त्यामुळें त्या बंडात सामील झाल्या व ग्वाल्हेर जवळ त्यांस डोक्यावर वार लागून तारीख १८ जून १८५७ रोजीं त्यांचें देहावसान झालें. " शिस्तीनें व शहाणपणानें लढणारा पुढारी बंडखोरांमध्यें कायतो लक्ष्मीबाई होत्या " असे त्या वेळच्या ब्रिटिश अधिकाऱ्यांनी उद्गार काढलें आहेत.

